


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

साहित्य • कला • संगम


## अनुक्रमणिका






वर्ष १५ वें

जून १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



महाराष्ट्राला दुहीचा शापच आहे कीं काय नकळे. जुन्या इतिहासांत या दुहीच्या कलागतिमुळें महाराष्ट्रानें खूप नुकसान सोसलें. आजहि महाराष्ट्राच्या राजकारणांत हें दुहीचें पिशाच्च पुनरपि डोकें वर काढूं लागलें आहे.

# तो गोड समझोता

आणि त्यामुळें १७९२ सालीं महादजी शिंदे आणि नाना फडणीस या दोन मऱ्हाटी म्होरक्यांत वितुष्ट आलें. त्यावेळीं महादजी शिंदे दक्षिणेंत फौजफाट्यानिशीं उतरत आहेत ही वार्ता कळतांच जाणत्यांची मनें साशंक झालीं. पण दोघानींहि दूरदर्शीपणानें समझोता केला. नाना–महादजींच्या या भेटीचें वर्णन पेशव्यांचे हैदराबादचे वकील गोविंदराव काळे यांस नानांनीं कळविलें. तें वृत्त ऐकून हर्षभरित झालेल्या गोविंदरावांचें पत्र पुढें उद्धृत केलें आहे. आजहि अशाच समझोत्याच्या गोड प्रसंगाची वाट पाहाणाऱ्या महाराष्ट्रीय वाचकांना हें पत्र खात्रीनें आवडेल यांत शंकाच नाहीं.

“ ...... ऐशियास पत्र पाहतांच रोमांच उभे राहून अति संतोष जाहला. याचा विस्तार पत्रीं किती लिहूं ? सीमा असे. यावरून ग्रंथांचे ग्रंथ मनांत आले. ते लिहिल्यानें बहुचकपणा दिसतो. दिसो, परंतु जें मनांत आलें त्यांतून किंचित् अमर्याद करूनं लिहितों. एक एक रकम ( गोष्ट ) मनांत आणून दीर्घ दृष्टीने तोलून पाहिल्यास खरें आहे असेंच निघेल. ते काय ? तपशील—**अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदुंचें स्थान–तुरुकस्थान नव्हे.** हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजित पावेतों. त्यांनीं राखून उपभोग केला. त्या मागे राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचें प्राबल्य् जालें. चकत्यांनी ( मोंगलांनी ) हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं अलमगीराचे कारकीर्दींत यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया बसून ओलें अन्न विकावें, सर्वांनीं घ्यावें हे नौबत गुजरली ( द्वाही फिरली ).

त्या दिवसांत कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व धर्म राखते निघाले त्यांनी किंचित् कोन्यांत धर्मसंरक्षण केलें. पुढें कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे जाले कीं, असें कधीं जाले नाहीं; अमुक ब्राह्मणांनी राज्य केलें. असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम अवतारीं काय असेल तें असो. त्या गोष्टी यांस शिंदे होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतीचे पुण्यप्रतापें करून व राजश्री पाटीलबाबाचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमें-करून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें ? प्राप्त जालें तेणेंकरून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे तरी मोठे मोठे तवारी-खनामे ( बखरी, वृत्तांत ) जाले असते. **यवनाच्या जातींत तिळा-इतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनाबरोबर करून शोभ-वावी; आमचे हिंदूंत गगनाइतकी जाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे.** असो अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठीण. दोस्त दुष्मन फार. यवनांचे मनांत की काफरशाही ( मराठशाही, शब्दशः लबाड, परके लोकांची बादशाही ) जाली हें बोलतात.

लेकिन ( परंतु ) ज्यांनी ज्यांनी हिंदुस्थानांत शिरें उचललीं त्यांचीं शिरें पाटीलबाबानीं ( महादजी शिंद्यांनीं ) फोडिलीं. कोणाच्याहि मनांत हे वाहाडले, तें शेवटास जाऊं नये. यास्तव नाना स्वरूपें व युक्तीकरून नाश करावे ऐसे आहेत. व लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन **उपभोग घ्यावे हे पुढेच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. जाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्य प्राप्त इतकेंच नाहीं, तरी वेदशास्त्र-रक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मण प्रति-पालन. सार्वभौमत्व, हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत.** हे किमया (अद्भुत कृति) संभाळणें हक आपला व पाटीलबावांचा यांत वेत्यास पडला की दोस्त दुष्मन मज-बूद. संशय दूर जाले हें अति चांगले ! अति चांगले ! या उपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मैदानांत असाव्या. त्यांचे मनसबे दौडावे, वेत्यास पडावे, तमाशे पहावे, असे जन जे आहेत ते उशापायथ्यास लागून आहेत. चैन नव्हतें. आतां आपण लिहिल्या-वरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेच मनन व्हावें. खरें कीं लटके हें समजावें. रवाना छ ११ जिल्काद हे विनंती. ”
( आषाढ शु० १३ शके १७१४—२ । ७ । १७९२ )
[ इतिहास संग्रह, ऐतिहासिक टिपणें, भाग १, टिपण १३.] • •



आणि हा आजचा महाराष्ट्र





**सती : सावित्री**

तां सुमध्यां पृथुश्रोणीं प्रतिमां कांचनीमिव
प्राप्तेयं देवकन्येति दृष्ट्वा सम्मेनिरे जनाः ॥
तां तु पद्मपलाशाक्षीं ज्वलंतीमिव तेजसा
न कश्चिद्वरयामास तेजसा प्रतिवारितः ॥

**— वनपर्व-महाभारत**

ती कनकाची पुतळी केवळ नितंबिनी सुंदरी
स्तिमित जनांना गमलें आली देवसुता भूवरी
राजिवराजस नेत्र, धगधगे तेजानें अंग तें
त्या दीप्तीनें दूर राहिलीं सकलांचीं वांछितें

**—कुसुमाग्रज**

अनुक्रमणिका



…ामिनी

महाराष्ट्राला दुहीचा … काय नकळे. …त्र दिपोनी ”

( पंजाव )

पंजाबी शेतकऱ्यांचें आवडतें लोकनृत्य म्हणजे 'भांगडा'. हें लोकनृत्य अस्सल पुरुषी आहे आणि पंजाबच्या कानाकोपऱ्यांत सणा-सुदीच्या दिवशीं भांगडाचा प्रयोग होतोच. सामूहिक लोकनृत्याच्या या प्रकारांत कुणासहि भाग घेतां येतो. नाचणारे शेतकरी वर्तुळाकार फेरा धरून हा नाच करीत असल्यामुळें कोणत्याहि क्षणीं नाचाचा बेरंग न करतां त्यांत कुणासही सामील होतां येतें. गळ्यांत ढोलकें अडकवून ढोलकेवाला वर्तुळाच्या मध्यभागीं उभा राहातो आणि नाचणाऱ्यांना गति वाढविण्याची वेळोवेळीं सूचना देत असतो. ढोलकेवाल्याच्या मागें दोघेतिघे नृत्याचे सूत्रधार म्हणून उभे राहिलेले असतात. नाचणारे शेतकरी नाचतांना हातवारे करतात आपल्या लाठ्यांच्या साहाय्यानें ठेका देतात, टाळ्या पिटतात आणि मधून मधून एक लोकगीत म्हणतात. या नृत्याच्या वेळीं शेतकरी चित्रविचित्र पोशाख करतात. रेशमी पटका, लुंगी, पंजाबी कुडतें, आणि काळें जाकीट—त्याला चकाकणारी शुभ्र बटनें—! गव्हाची पेरणी झाली कीं पंजाबी युवक पौर्णिमेच्या रात्रीं एका मैदानांत जमा होतात आणि थकेपर्यंत नाचतात.

पंजाबी युवकांप्रमाणें पंजाबी युवतींचा 'गिडधा' नाच फार लोकप्रिय आहे. फेर धरून गाणीं म्हणत पंजाबी तरुणी जेव्हां नाचूं लागतात तेव्हां तें दृश्य मोठें विलोभनीय असते. त्यांचे हावभाव अतिशय साधे पण मोहक असतात.

पंजाबच्या दऱ्याखोऱ्यांतहि लोकनृत्याचे पडसाद घुमत असतात. कुलु प्रदेशांतील मे ते ऑक्टोबर हा कालखंड म्हणजे जत्रा आणि उत्सव यांची पर्वणीच. या काळांत लोकनृत्याची दंगल झडत असते. मेच्या मध्यास जेव्हां गव्हाचें पीक कापणीला तयार होतें तेव्हां या यात्रा सुरू होतात. आजूबाजूच्या गांवांतील खेडूत उत्तम पोशाख घालून यात्रेच्या ठिकाणीं जमा होतात. देवाच्या भोंवतीं फेरा धरून हे लोक नाच करतात. नाचाला हळुहळू गति मिळते ती इतकी कीं नाचणारे थकून जातात. त्यांची जागा घ्यायला ताज्या दमाचे गडी तयार असतातच. दुर्गम प्रदेशांत कांहीं ठिकाणीं स्त्रियाहि या नाचांत सामील होतात.

कुलूची प्राचीन राजधानी सुलतानपुरस्थेथें दसऱ्याच्या दिवशीं मोठा नृत्य-सोहळा होतो.

( चित्रें पृष्ट २ वर )

—कथा–कली

● ● ●





वैशाख शके १८८१ जून १९५९

# सावित्री

## भारतीय स्त्रीत्वाचे महान् गाणें

—पु. भा. भावे

गांवाबाहेर वटवृक्षाचा दाट विस्तार आहे. मूळ वृक्ष कोणता आणि त्याचा वंश कोणता हें ओंळखणेहि कठीण आहे. एका बुंध्याला टेकून मी आकाशाकडे पहात होतों. मला आकाश असें दिसतच नव्हते. अगणीत पाने मस्तकावर झुलत होतीं. आणि त्या पानांचा हिरवा रंग घेऊन मावळतीचा पिवळा प्रकाश वटवृक्षांचा त्या राईंत पाझरत होता. सभोंवार अमर्याद एकांत होता. केवळ झाडाची पानें तेवढीं सळसळत होतीं. आणि कोणीं एक रानपांखरू तीव्र स्वरांत साद घालीत होतें. ती साद एकांताच्या त्या घुमटांत घुमत होती. त्या मंद धूसर, स्वप्नमय प्रकाशानें तळपणाऱ्या घुमटांत "सावित्री–सावित्री" ती साद घालत होती. "सावित्री–सावित्री" फिरत्या डोळ्यांनी मी ऐकत होतों. आतां दुसरें एक पाखरूं साद घालूं लागलें. "सत्यवान–सावित्री" उंचस्वरांत तें ललकारत होतें. "सत्यवान–सावित्री" "सावित्री–सत्यवान".

आज दिवसभर मी सावित्रीचें पुण्यनाम ऐकलें होतें. सुवासिनींनीं आज उपोषण केलें होतें. शुचिर्भूत आणि सुभग अशा व्रतस्त ललना वटवृक्षाला प्रदक्षिणा घालीत होत्या. सावित्रीच्या सत्वाला, सावित्रीच्या प्रेमाला, सावित्रीच्या निष्ठेला, सावित्रीच्या धैर्याला त्या वंदन करीत होत्या. सावित्रीपासून त्या प्रेरणा मागत होत्या, आशीर्वाद मागत होत्या. सालंकृत सुंदरींचे समूह आज सावित्रीचे गुणसंकीर्तन करीत होते. "सावित्री-सत्यवान" अनेक कंठांतून शब्द उमटत होते "सत्यवान-सावित्री."

आणि ती दोन पाखरें उंच स्वरांत परस्परांना साद पडसाद देऊन ललकारत होती, "सावित्री-सावित्री" "सत्यवान-सावित्री" अगणित हिरव्या पानांनीं बांधलेल्या त्या वटवृक्षाच्या मनोऱ्यांत शब्द घुमत होते. शतकाशतकांतून! सहस्रावधी वर्षांतून! सावित्री-सत्यवानाच्या त्या प्रेमगंगेनें त्या वटवृक्षाला अमरत्व दिलें होतें. ह्या वृक्षानें दिव्य प्रेमाचा तो सारा इतिहास, मूर्तिमंत पाहिला होता. ह्या वृक्षानें? खरोखर ह्या वृक्षानें? सावित्री ह्यानें पाहिली होती? सत्यवान सावित्री?

"—होय. शाल्वकन्या सावित्री."

गडगडणाऱ्या मेघाच्या कंठांतून यावेत तसे शब्द उमटले. मी दचकलों, व स्वप्नाच्या सृष्टींत जागा झालों. हा घनगंभीर स्वर त्या प्राचीन पुरातन वृक्षाचा होता. त्या वटवृक्षाचा, "होय, शाल्वकन्या सावित्री!" तो स्वर म्हणत होता. सत्यवानाची सावित्री! राजा अश्वपतीची मुलगी सावित्री! प्रेममयी, तेजमयी, त्यागमयीं, सत्वधीर, तपस्विनी सावित्री!

"तिला पाहिले आहे तुम्हीं?" मी विचारलं.

"होय" त्या स्वारानें उत्तर दिलं.

"तुम्हीं तिला कसं पाहिलं असाल?" साशंक स्वरांत मी विचारलें.

"तूं मला पाहतोस हें खरं आहे कीं नाहीं?"

"खरं आहे."

"तर मग मी सावित्रीला पाहिलं हेहि खरं आहे. कारण मी तोच

सनातन वृक्ष आहें. सावित्रीचं प्रेम जितकं सनातन, सावित्रीची तपस्या जितकी सनातन, सावित्रीची थोरवी जितकी सनातन तितकाच सनातन मीहि आहे. मी जुना किंवा नवा नाहीं. मी तोच आहे. ”

“ तूं—तुम्ही तेच आहांत ? ”

“ होय, मी तोच आहे. माझं रूप तेंच आहे. माझे गूण तेच आहेत. माझी आकृती तीच आहे. माझी प्रकृतीहि तीच आहे. त्याच भूमितील जीवनसत्वावर मी तसाच पोसत जात आहे. हीच ती भूमि आहे, व ह्याच मातींत माझीं मुळें खोलवर गेलीं आहेत. त्या मातीनेंच मला माझे प्राण व गुण दिले आहेत. ह्या सनातन मातींतच मी अनादिकालापासून उभा आहे. ह्या मातीनेंच सावित्रीलाहि निर्माण केले. सावित्रीची परंपरा पोसणारी व फुलविणारी ती हीच माती आहे. ”

“ तर मग सावित्रीला तुम्हीं पाहिली आहे एकूण ! ” अविश्वासाच्या स्वरांत मीं उद्गारलों.

“ मला वाटलं कीं सावित्री ही केवळ कविकल्पना असेल. ”

“ होय. ” तो वृक्ष उत्तरला, “ सावित्री हें एक कविकल्पनेइतकेच सुंदर सत्य आहे. कल्पना हेहि एक सत्यच नाहीं काय ? कल्पना सत्याला सजवीत नाहीं काय ? कल्पनेंतूनच सत्य आकारास येत नाहीं काय ? त्या कल्पनारम्य सत्याची कवीकुलें गाणीं गात नाहींत काय ! त्या सुंदर सत्यावर माणसें युगानुयुगें लुब्ध होत नाहींत काय ? सावित्री हेंहि एक असेंच सुंदर व सनातन सत्य होतें ! तें एक असेंच अमर प्रेमाचें, अमर्याद निष्ठेचे व अलोट धैर्याचे गाणें होतें. तें गाणें ह्या देशांतील स्त्रिया आजहि मोठ्या भक्तिभावानें आळवीत आहेत !”

“ तर मग सावित्री काय केवळ एक गाणें होतें ? ” मी विचारलें.

कांहीं क्षण शांततेचे गेले आणि मग त्या स्वरानें फार निश्चितपणें उत्तर दिलें, “ गाणें आणि सत्य. सत्याचें गाणें. तें पहा तें प्रेमाचें सनातन सत्य, ती पहा सावित्री......

डोळे फाडून मी पहात राहिलों. विजेसारख्या तेजस्वी, फुलासारख्या कोमल, गंगेसारख्या विशुद्ध आणि निर्झरासारख्या चपळ अशा एका बालेची मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर साकार झाली होती. “ सावित्री ” श्वास आवरत मी म्हणालों, “ सावित्री ” माझे मन चांचपडत होतें. ती खरेंच सावित्री होती काय ? ती काय माझ्या परिचयाची होती ? तिला मी कुठें पाहिलें होतें ? कुठें पाहिलें होतें बरें मी तिला ? हे कोवळे वय आणि ही कठोर तपस्या ! हें बालिश सौन्दर्य आणि ह भावनेची उत्तुंगता ! हें लवचिक शरीर आणि ही वृत्तीची स्थिरता ! हें निरागस स्मित आणि ही निष्ठेची सखोलता ! हा दुबळा देह आणि हे दुर्दम्य सामर्थ्य ! प्रत्यक्ष मृत्यूला सामोरे जाणारें ! प्रत्यक्ष मृत्यूवर मात करणारें ! सारें जग जेथें हतबल होतें, तेथेंहि हिची इच्छा बलवत्तर ठरली, हिची निष्ठा बलवत्तर ठरली ! जेथें सारें जग पराभूत होतें तेथें हिचें प्रेम विजयी ठरलें ! प्रत्यक्ष कृतांतासमोर ! प्रत्यक्ष मृत्यूनें हिच्या सौभाग्याला पुनर्जन्म दिला ! अंध द्युमत्सेनाला त्यानें दृष्टीचें वरदान दिलें. त्या विजनवासी राजाला सिंहासनाचें वरदान दिलें ! शैब्येला त्यानें पुत्रांचे वरदान दिलें. सत्यवानाचे हरण केलेले प्राण त्यानें परत केले. एका कोवळ्या पोरीसमोर प्रत्यक्ष मृत्यूनें माघार घेतली ! हें सारें कसें घडलें असेल ? सावित्री यमधर्माला काय म्हणाली असेल ? प्रेममयी सावित्री यमधर्माला म्हणाली असेल, कीं हे यमधर्मा, मी सावित्री सत्यवानाची पत्नी तुझ्या मागोमाग येत आहे.

आपल्या ह्या मुलीवर कृपा कर, साऱ्या स्त्री जातीवर कृपा कर, आणि माझा सत्यवान मला परत दे. सत्यवानावर मी प्राणाधिक प्रेम केलें आहे. मद्रदेशाच्या ह्या विजनवासी राजपुत्रापेक्षां अधिक



ओरीसांतलें संयुक्त मंत्रिमंडळ



अनुक्रमणिका

प्रिय मला कांहींहि नाहीं. मी वैभवावर प्रेम केलें नाहीं अथवा सत्तेवर प्रेम केलें नाहीं. ह्या गुणशाली व तापसी सत्यवानावर मी प्रेम केलें. माझा पति म्हणून ह्या गुणसुंदर पुरुषाला माळ घालतांना दारिद्र्याचे भय मी बाळगले नाहीं, वनवासाचे भय बाळगले नाहीं, आणि हे सर्वशक्तिमान् मृत्यू, तुझेंहि भय मी बाळगले नाहीं.

—हे मृत्यू, तुझ्या सामर्थ्याला माझे प्रणाम असोत. पण तुझ्या सामर्थ्याचा प्रहार तूं माझ्या सत्यवानावर करूं नकोस. कारण तो प्रहार एकनिष्ठ प्रेमावर पडेल. तो प्रहार तारुण्यसुलभ स्वप्नांवर पडेल. तो प्रहार पतिव्रतेच्या पुण्याईवर पडेल. पतिव्रतांच्या सामर्थ्यावर पडेल. हे दयाळू यमधर्मा, आपल्या राज्याला, आणि आपल्या वैभवाला मुकलेला हा सत्यवान आपल्या प्राणानांहि मुकणार आहे. आमच्या विवाहघटिकेपासून एका वर्षांतच तो तुझ्या स्वाधीन होणार आहे. हें विधिलिखित नारदानें माझ्या पित्याला सांगितलें होतें. हे भीषण भविष्य माझ्या पित्यानें मला अश्रुपूर्ण डोळ्यांनीं कथन केलें होतें. आणि तरीहि मी सत्यवानाशीं विवाहबद्ध झालें. सत्यवानावर माझें प्रेम जडलेलेच होतें. मरणभयानें जें माघार घेतें तें प्रेम कसलं? जे कच खाते, जे चळते, जे सुखदुःखाचे हिशोब करते ते प्रेम कसले? यमधर्मा, प्रेम करतांना मी हिशेब केला नाहीं, प्रेम करतांना मी भय बाळगलें नाहीं, मला माझा सत्यवान पाहिजे होता—आमरण पाहिजे होता व मरणोत्तरहि पाहिजे होता. मी त्याची पत्नी म्हणून जगणार होतें व त्याचीच पत्नी म्हणून मरणार होतें! एक क्षण, एक वर्ष, अनंतकाल! पण सावित्री पत्नीं होती सत्यवानाचीच. तो दरिद्री असेल, वनवासी असेल, तापसी असेल व परागंदाहि असेल! परंतु छायेंत अथवा प्रकाशांत, सुखांनं अथवा दुखांत, जीवनाच्या राज्यांत अथवा मृत्यूच्या साम्राज्यांत त्याची पडछायेप्रमाणें सोबत करणें हेंच माझें—त्याच्या पत्नीचें—कर्तव्य होतें! तेंच कर्तव्य यमधर्मा ह्या भूमीच्या परंपरेने मला शिकविलें आहे! तेंच कर्तव्य तुझ्या साक्षीनें मी पार पाडीत आहें.

—अल्पायुषी?—नाहीं—नाहीं यमधर्मा! पतिव्रतेचे सौभाग्य अल्पायुषी कसें असेल? एका निष्पाप मुलीचें प्रेम अल्पायुषी कसें असेल? तिची निष्ठा अल्पायुषी कशी असेल? श्रद्धा अल्पायुषी कशी असेल? तिचे सूख अल्पायुषी कसें असेल? सत्यवान अल्पायुषी कसा असेल?

हे परम न्यायी, व परम कृपाळू यमधर्मा! जर्जर जरा अल्पायुषी असावी! पाप अल्पायुषी असावें! पुण्य अल्पायुषी कसें असेल? तारुण्य अल्पायुषी कसें असेल? सत्यवान अल्पायुषी कसा असेल? सावित्रीचें कुंकूं, सावित्रीचें सौभाग्य अल्पायुषी कसें असेल? सावित्रीच्या सत्यवानावर प्रेतकळा आली तर निरागस प्रेमावर प्रेतकळा येईल! निष्ठेवर प्रेतकळा येईल! पतिव्रतांची तपश्चर्या विफल ठरेल! अमर्याद प्रेमाला व अविचल निष्ठेला वैधव्याचे प्रायश्चित मिळते असा विपरित अनुभव आला तर जगांत आकांत उडेल! पुण्य हेच पाप ठरेल! नीति हीच अनीति ठरेल! प्रेम हाच अपराध ठरेल! असें जर झाले तर साध्वींचा व सद्गुणांचा आधारच तुटेल. मग धर्मावर कोण बरें श्रद्धा ठेवील? म्हणून

[ पान ५६ वर पहा ]

## या महिन्यांतील माननीय व्यक्ति



### कै. भाऊराव पाटील.

गेल्या महिन्यांत कर्मवीर भाऊराव पाटील यांचें आकस्मिक निधन झालें. महाराष्ट्रांत आजकाल ध्येयनिष्ठ पण कर्तृत्ववान अशा कार्यकर्त्यांची मोठीच वाण भासूं लागली आहे. अशा परिस्थितींत भाऊराव पाटलांचें हें निधन म्हणजे महाराष्ट्राच्या सामाजिक आणि शैक्षणिक क्षेत्रांतील कधींहि भरून न येणारी पोकळी. दक्षिण महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत शिक्षणाची उज्वल नशाल सतत तेवत ठेवण्याचें महान् कार्य कर्मवीर भाऊराव पाटलांनीं केलें. पारतंत्र्याच्या काळांत हें कार्य विशेष अवघड होतें. दीनदुबळ्या रयतेला शिक्षण दिल्याशिवाय त्यांची प्रगति होणार नाहीं. असा कर्मवीर भाऊरावांचा ठाम विश्वास होता आणि या विश्वासाच्या जोरावर त्यांनीं मऱ्हाटी शेतकऱ्यांच्या पोरांना स्वावलंबनाचे धडे गिरविण्यास लावून शिक्षणाचा महामंत्र महाराष्ट्राच्या खेडोपाडीं घुमविला. त्यांची रयत शिक्षण संस्था म्हणजे भाऊरावांच्या कार्याची जागती साक्ष. या संस्थेतून असंख्य होतकरू विद्यार्थी पुढें नांवलौकीकाला आले आणि एकापरीनें बहुजनसमाजाच्या प्रगतीचें फार मोठें कार्य भाऊरावांनीं साधलें. 'बहुजन हिताय बहुजन सुखाय' हें भाऊरावांच्या जीवनाचें महान् सूत्र होतें. आणि यांतच त्यांनीं आपलें सर्वस्व वेचलें. महाराष्ट्राच्या या थोर आत्म्याला आणि त्याच्या पवित्र स्मृतीला आमचे सहस्र प्रणाम्।

• • •



# अवकळा

अरविंद गोखले

दिवसभर ऑफिसांत काम करून थकलेले आप्पा आणि वसंता संध्याकाळच्या सोनेरी वेळीं उल्हसित वृत्तीनें आपल्या मातृप्रसादाकडे परतत असत. घरांत उत्साहाने त्यांचं स्वागत होई; परंतु अचानक एका विद्रूप, विदारक घटनेनं तें सारं कुटुंब हीन-दीन झालं, त्यांच्या सगळ्या सुखांत जणुं शेण कालवलं गेलं....

अनुक्रमणिका

बलात्कारानें बधीर झालेलं तें घर साऱ्या वस्तीत कसंबसं उभं होतं. छपरावर जणूं वीज पडली होती आणि घरापुढची छोटी फुलबाग करपून गेली होती. फाटकावरची ' मातृप्रसाद ' ही पाटी पांढरीफटक पडली होती. भिंतींना ओल आली होती. दारंखिडक्या सुजल्या होत्या. साऱ्या खोल्यातलं चैतन्य हरपलं होतं व आंत वावरणारी माणसं दचकल्यासारखी दिसत होती. आजूबाजूच्या लोकांना जाणवलं होतं कीं नाहीं, कुणांस ठाऊक, पण कारखानीसांच्या घराला ह्या आठ दिवसांत अवकळा आली होती. एका विदारक, विद्रुप घटनेनं सारं कुटुंब हीनदीन झालं होतं.

ऑफिसातून परतलेल्या आप्पा कारखानीसांना आपलं घर समोर दिसलं आणि त्यांच्या पायातलं बळच गळालं. घरांत जाऊं नये असं त्यांना वाटूं लागलं. फायलींच्या ओझ्याखाली त्यांनी सात आठ तास मोकळेपणानें घालवले होते. पंचवार्षिक योजनेसाठी एक नवी स्कीम तयार केली होती. त्यानं ऑफीसमधल्या सगळ्यांचे पगार वाढवले होते. खूप नव्या जागा निर्माण केल्या होत्या. आप्पा स्वतः-वरच खूष झाले होते. साहेबही त्यांच्यावर खूष झाला होता. आज मधल्या सुट्टीत आप्पांनी आणिक एक नवी गोष्ट केली होतीं. ऑफिसच्या मोरीत त्यांनी एक आरसा आणून बसवला होता. तोंड धुतल्यावर कारकुनांनी आपले चेहरे आरशांत पहावेत नि स्वतःवर खूष होऊन नव्या उत्साहानें कामाला बसावे ही कल्पना. स्वतः आप्पांनी आरशांत मनमुराद न्याहाळून घेतलं होतं; आणि मग खुर्चीवर ते बसले तरी आरशातला स्वतःचा चेहरा त्यांना दिसत राहिला होता.

पण मग समोर घर दिसूं लागलं आणि त्यांची मुद्रा काळवंडली. आरशातलं प्रतिबिंब आक्रसलं; अधोमुख झालं. कितीतरी दिवसांनी आपण आरशांत स्वतःला पहात बसलो, स्वतःचं कौतुक केलं, हें आप्पांच्या ध्यानांत आलं. गेले आठदहा दिवस आपण काळोखाने व कुरुपतेनें भरलेल्या जगांत भकास चेहऱ्यानें काढले हे त्यांना आठवलं. स्वतःचीच त्यांना अनुकंपा वाटूं लागली. इतक्या नेकीनें, मानानें जगलो, नौकरीत मोठ्या जागेवर चढलो, अनेकांना मदत केली, घराण्याचं नांव उजळवलं, संसार फुलवला, मुलांना मोठं केलं—पण दैवाला पाहवलं नाही. चोरी फौजदारी तरी व्हावी, पण घरांतच कली शिरला; नि अब्रू लुटली गेली. आप्पांना कळवळून आलं. पायाखालची जमीन गरगरू लागली. ऑफिसांत जावं व शांतपणे डोकं धरून बसावं असं वाटूं लागलं. कुठेतरी एकांत मिळावा, कुणीतरी धीर द्यावा, यासाठीं त्यांचं मन आक्रांत करूं लागलं.

पण मग ते तसेच घराकडे जाऊं लागले. घरातल्या कर्त्या पुरुषानेंच असं केलं तर इतरांनी कुणाकडे बघायचं ? त्यांना धीर कुणी द्यायचा ? सुनेला, मुलीला नि धाकटीला–ही—आप्पांना घरची ओढ तीव्रतेनं लागली; अन् पुन्हां कुणीतरी बलात्कार करायला आपल्या घरांत शिरत आहे ह्या भावनेनें ते फाटकाशी उभं राहून सभोवार बघूं लागले.

आप्पा आलेलं प्रथम पाहिलं छायेनं. एकट्यानं मांडलेला भातुकलीचा खेळ टाकून ती केव्हांची वडिलांची वाट पहात होती. सगळी दुपार तिला खायला उठली होती. आत्या तिला मैत्रिणींकडे जाऊं देईना, कीं बागेंत फिरूं देईना. शाळेला सुट्टी पडली होती नि दुपार ही मोठी झाली होती. छायेचा वेळ जातां जाईना. झोपलं तर कसली विचित्र स्वप्नं पडत ! भातुकली खेळण्यांत नि आते-भोंवती स्वैपाक घरांत हिंडण्यांत छायेनं वेळ दवडला. आणि उन्हं उतरल्यापासून ती आप्पांची वाट पहात खिडकीत बसून राहिली.

चिमुकल्या हातांचा विळखा अचानक पडल्यानें आप्पा बावरून गेले. छायेला त्यांनी पोटाशी घेतलं व तिच्या सुकलेल्या चेहऱ्यावरुन हात फिरवला. त्यांचा चेहरा आणिकच उतरुन गेला. काळजांत कालवाकालव झाली व ते संशयी, खुनशी नजरेनें शेजारच्या भडसावळ्यांच्या बंगल्याकडे बघूं लागले. खिडक्यांना लावलेल्या पडद्यांतून भडसावळे मंडळी आपल्याकडे बघत असतात, आपल्या घरांतल्या त्या घाणेरड्या गोष्टीबद्दल चविष्टपणें चर्चा करतात......भडसावळ्यांच्या त्या थोरल्या माजलेल्या पोराचा ह्या कृत्यांत हातही असावा...... आप्पांना एकेक वाटत होतं आणि त्यांच्या कपाळावरची एकेक शीर ताठरत होती.

" कार्टे—बाहेर कशाला धावतीस ?—" अलवणाचा पदर नीट लपेटून घेत आत्या आतघरांतून ओरडली. फाटक वाजलं तेव्हां तिचे कान टवकारले गेले. पाय वाजले तेव्हां तिच्या छातींत धस्स झालं. दार उघडून छाया धावली तेव्हां तीही चित्त्यासारखी धांवली. आप्पांना पाहतांच तिनें सुस्कारा सोडला. पण पुन्हां ती अस्वस्थ झाली. कर्कशपणें म्हणाली, " दारांत काय करताय दोघं ?...या घरांत आधीं ! "

आत्याच्या आरड्यानं पलंगावर पडलेली नलिनी दचकून उठली. दुपारभर ती झोपायचा यत्न करीत होती. रात्रभर डोळा लागला नव्हता. आठ दहा दिवस शांत झोपच नव्हती. निजल्यावर नि जागतेपणीहीं वाईट दृश्यं दिसत. वाईट वाईट विचार डोक्यांत येत. लग्नामुळें अंगानें भरणारी, मोहक चेहेऱ्याची उमेदी नलिनी आजाऱ्यासारखी झाली होती. लग्न होऊन सहाच महिने झाले होते, पण तिला आतां सगळा संसार कळाहीन, कुरुप वाटूं लागला होता. शृंगाराची तर तिनं भयंकर धास्ती घेतली होती. नवऱ्यासमोर जाणंच नको वाटत होतं. आणि सासऱ्याला नि आतेसासूला तोंड दाखवण्याचीही तिला लाज वाटत होती.

पण तिला उठणं भाग होतं. सासऱ्याला चहा करून द्यायला हवा होता. घरकामही बघायचं होतं. नलिनी कशीबशी उठली व खोलीबाहेर आली. दिवाणखान्यांतल्या आरशांतच तिची अन् आप्पांची दृष्टादृष्ट झाली. नलिनीची नजर खाली गेली. शरमेने, दुःखानें तिच्या उरांत कळ आली.

आप्पांनी छायेला जास्तच जवळ ओढलं व ते दमून कोचावर बसले. त्यांना ऑफिसांतल्या आरशाची आठवण झाली. स्वतःची ऑफिसांतली फुललेली मुद्रा आठवली. आरसा लावतांच खूष झालेल्या कारकुनांचे चेहरे दिसले; अन् मग सुनेच्या काळवंडलेल्या प्रतिबिंबाची आठवण होऊन ते गोरेमोरे झाले.

" वसंत दादा मला ऑफिसांतून चिकी आणणार आहे—" बापापासून दूर होत आणि खिडकीकडे जात छाया म्हणाली. " आज-





अनुक्रमणिका

आप्पा घरी आल्यावर आपल्याला उचलत नाहीत, खाऊ देत नाहींत म्हणून ती खट्टू झाली होती. वसंताकडून तिनें चिकी आणायचं कबूल करून घेतलं होतं. अन् वहिनीभोवती गुळुगुळु करणारा नि छायेला हिडीस फिडीस करणारा वसंतदादा 'चिकी आणशील का' विचारल्याबरोबर एकदम तयार झाला होता.

आप्पांनी सावकाश कपडे बदलले व दिवाणखान्यांतच घुटमळणाऱ्या आतेला विचारलं,

"मीना कुठाय ?"

"बाहेर गेलीय "

"बाहेर ?—" आप्पा भकासपणें उद्‌गारले. बाहेर म्हणजे जणूं गुंडाच्या तावडीत असंच त्यांना म्हणायचं होतं.

"समोरच्या तारुताई आहेत बरोबर. लायब्ररीत पुस्तक आणायला गेलीय. मीच म्हटलं, कांहीं वाच, म्हणजे विरंगुळा वाटेल—"

तारुताईंचं नांव ऐकल्यावर आप्पांचा जीव भांड्यात पडला. तारुताईंची नेहमीच मदत होत असे. आप्पांची पत्नी सहा वर्षापूर्वी वारली तेव्हां तारुताईंनीच येऊन सर्वांचं सांत्वन केलं; आणि परवां तो भयंकर प्रकार घडला तेव्हां तारुताईच प्रथम धावून आल्या. अडीअडचणीला, सांत्वना—समजुतीलाच त्या पांढऱ्या केसांच्या नि ममताळू हृदयाच्या स्त्रीवर कारखानीसांना नेहमी विसंबता येत असे.

मग मीनावर आपण उगाचच रागावतो असं आप्पांना वाटूं लागलं. तिचा विचारीचा काय दोष ?—अल्लड, भोळी पोरगी ती. आपण तिला कॉलेज सोडून दे म्हणून काल सांगितलं ! शिक्षण थांबवून तिला दूर कुठे उजवून टाकायचं ठरवलं ! तिचं तसं वय कुठें झालंय एवढं ? अन् अभ्यासांत ती मागें थोडीच आहे ? – पण आपल्याला ती एकदम नको झाली. घरांत जळता निखारा भासूं लागली. कां—तरं परवां ते घडलं म्हणून !—मीनाचा काय अपराध ? तिला बिचारीला जन्मभर रडत ठेवायचं म्हणजे काय ?

आप्पा अस्वस्थपणे फेऱ्या घालूं लागले. मध्येंच ते मागीलदारीं तांदूळ निवडणाऱ्या आतेकडे पहात व थबकत. मध्येंच बाजूला चुलबोळकी घेऊन बसलेल्या छायेकडे पहात व त्यांना मटकन् खाली बसावंसं वाटे. मग त्यांना स्वैपाक घरांतल्या सुनेची आठवण येई. तिच्याशीं मोकळेपणानें बोलायची इच्छा होती. पण ते नुसतेच फेऱ्या घालीत राहिले.

संध्याकाळची सोनेरी, उल्हसित वेळ असूनही त्या घरांत पोकळ, अभद्र शांतता भरून राहिली.

नलिनीनें स्वैपाक घरांतली चार भांडी उगाच इकडे तिकडे केली. कशांत तिचं लक्षच लागत नव्हतं. गेल्या आठवड्यांतला तो प्रसंग सारखा भुतासारखा तिच्या बुबुळापुढें नाचे नि मग लगोलग पाठवणी केलेल्या आपल्या बहिणीची तिला आठवण येई. चार दिवसाकरितां म्हणून कमावलेली मोठ्या बहिणीच्या सासरीं आली नि लगेच अत्याचार घडला. बहिणी बहिणी गळ्यांत गळा घालून रडल्या. खालच्या मानेनें कमलिनी गेली नि नलिनीला आपलं सासर अधिकच उजाड वाटूं लागलं.

स्वैपाकघरातून ती बाहेर आली व मोरीत गेली. गार पाण्याचं धंघाळ पाहून तिला बरं वाटलं. आंघोळ करावी अगदी डोक्यावरून पाणी घेऊन मनसोक्त आंघोळ करावी, असं वाटलं. साबणाचा भरपूर फेस, पाण्याच्या धारा, टॉवेलचा खरखराट ह्यासाठी ती आतुर झाली. तिनं पदरही दूर केला. पण तेवढ्यांत कसल्याशा शरमेनं तिचं शरीर आकसलं. कसलीशी भिती तिला लपेटूं लागली. कुणी बघतंय—स्पर्श करतंय असं भासूं लागलं. बावरून तिनें चोहोंकडे पाहिलं. बंद दाराच्या एक बाजूला लहानशी फट होती. पूर्वी कधी ती फट लक्षांत आली नाही. त्या फटीतून सारं जग लोभट नजरेनं आपल्याकडे बघतंय असं तिला वाटूं लागलं. घाईघाईनें नलिनीने डोळ्यांना पाणी लावलं व ती बाहेर आली.

फाटक उघडून वसंता घरांत येत होता. दमलेला, त्रासलेला, सायकलला फरपटवणारा.

नवऱ्याला पाहिल्यावर नलिनीची कळी खुलली. एकदम तिला टवटवीत, टपोरं वाटलं. वसंताच्या जवळ बसून राहावं, त्याच्या विळख्यांत सगळं विसरावं अशी ओढ तिला लागली. पण मग तिचा आवेग ओसरला. काल रात्रीची तिला आठवण आली. काल रात्री, परवां रात्री...तो प्रसंग घडल्यापासून तिला सगळं किळसवाणं वाटूं लागलं होतं.

वसंतानें भिंतीला कशीबशी सायकल लावली व तो घाम पुशीत घरांत घुसला. ऑफिसांत त्याचा उगाचच साहेबाशी तंटा झाला होता. मग त्याला फौजदार कचेरीत जावं लागलं होतं. बलात्काराची फिर्याद लावावी कीं सगळं मिटवून टाकावं ह्या घोळांत त्याच्या मेंदूच्या ठिकऱ्या व्हायची पाळी आली होती. स्वतःवर उगाचच जोखीम घेतली असं झालं होतं; त्यापेक्षां आप्पा वकिलाकडे सोपवणार होते सारं, तेच चांगलं झालं असतं ! आतां घोळ वाढतच होता. त्रासलेला, कावलेला वसंता घरात शिरतांच अधिकच चिरडीला आला.

"आणलीस चिकी ?—" भातुकली आटोपून भावलीला साडी नेसवीत बसलेली छाया म्हणाली व भावली टाकून वसंताकडे धावली.

वसंता विलक्षण दचकला. सगळ्या दिवसांत तो छायेला विसरला नव्हता. पण छायेला चिकी आणायचं साफ विसरून गेला होता. छाया रडवेली झाली मग हातपाय आपटीत मोठ्यानं रडूं लागली.

फाटकाचा आवाज ऐकतांच आत्या लगबगीनें उठून बाहेर आली होती. रडणाऱ्या छायेला तिनें एरवी दोन धपाटे घातले असते. आठवं सरलं तरी घोडी रडते, हट्ट करते म्हणून तिला रागावली असती. अगदीं आईवेगळी असली म्हणून काय झालं?—पण आत्या आत्तां कांहीं बोलली नाहीं. तिला वसंताचाच राग आला. पण वसंतालाही ती कांहीं म्हणाली नाहीं. दिवाणखान्याच्या दारांत गोळा झालेल्या नलिनीकडे नि आप्पांकडे ती नुसती बघत राहिली.

एवढा वेळ मूक शोक करणाऱ्या घरांत छायेचं रडणं भरूं लागलं. तिचं बालसुलभ रडणं ऐकवत नव्हतं! सगळ्यांचेच चेहरे उतरले. वसंत कसाबसा म्हणाला, "आणतों आत्तां—कोंपऱ्यावरून—" आणि तो आल्या पावलींच सायकल ढकलीत बाहेर पडला—

आतेनं छायेला जवळ घेतलं. न बोलतां तिचें पदरानं डोळे पुसले. छायाही एकदम गप्प झाली. दोघी मागच्या दारी जाऊन कट्ट्यावर बसल्या. आत्यानं कागद पुढें घेतला नि ती 'राम-राम' असं सारखं लिहूं लागली. रामनामाच्या चिठ्या करून छाया त्या तळ्यांतल्या माशांना घालणार होती.

वसंत घाम निपटींत चिकीच्या वड्या घेऊन आला. आत्याचं 'राम-राम-राम' पाहूं लागला. त्याला सारखे 'रेपू-रेपू-रेपू' असेच शब्द दिसूं लागले.

स्वैपाकघराच्या दाराशी नलिनी उभं राहून सारं बघत होती. तिलाही लिहायचं होतं. आपल्या बहिणीला लांबलचक पत्र लिहायचं होतं. सारा शोक मोकळा करायचा होता. पण तिला तेवढाही उत्साह नव्हता. सगळं कसं बदललं होतं. पूर्वी नवरा यायची वेळ झाली कीं ती बागेंत उभी राही. त्याची सायकल धरी व घंटा वाजवी. दोघंही हंसत खेळत चहा घेत. मग जोडीनें फिरायला जात... आतां सगळ्या सुखांत जणूं शेण कालवलं होतं...

आप्पांच्या समोरून वसंता सरळ स्वैपाकघरांत गेला. वडिलांच्या नजरेला त्यानें नजर दिली नाहीं. आप्पाही खिडकींतून भडसावळ्यांच्या बंगल्याकडे पहात होते. "वकिलाकडे गेला होतांस कां?—करायची कां केस?—" त्यांना वसंताला विचारायचं होतं. "फौजदार भेटले. आपलीच बेअब्रू होणार आहे..." वसंता त्यांना सांगणार होता. पण दोघेही बोलले नाहीं. तो विषय त्यांचं डोकं उठवणारा, पुन्हां शोक, संताप, मूढता आणणारा होता. त्याबद्दल बोलणं पुढें ढकलणं एवढंच दोघांच्या हातांत उरलं होतं.

चहा घेतांना वसंत नलिनीला म्हणाला,

"तूं घे ना!—थोडा घे...ह्या वेळेला घेतेस नेहमीं..."

"नको-शपथ नको—"

"रागवलीस?"

"कुणावर रागवायचं? आपल्या कर्मावर?"

"असं काय?"

"कुठं काय-?"

"कमळीचं पत्र आलं?—"

"मीच लिहीन तिला. ती काय लिहीणार? दुर्दैवी बिचारी..."

दोघंही मग बराच वेळ गप्प राहिली. उद्या कपावर बोटं फिरवीत.

वसंताचं मन मग एकदम चिडीनें भरलं बायकोची तो आर्जवं करीत होता, पण ती धड बोलतही नव्हती. वसंतला नलिनीचा तिटकारा आला. कपाळाला आठ्या घालून त्यानें नलिनीकडे बघितलं एखाद्या क्षुद्र वस्तूकडे पहावं तसं. नलिनीला ते जाणवलं आणि नवऱ्याबद्दल तिचं मन आणिकच विटलं.

आत्या घरांत आली म्हणून दोघं उठली. छायेचं बोट धरून आत्येनं तिला स्वैपाकघरांत आणलं. छाया कंटाळली होती. आतेनं तिला वाटींत चिवडा दिला. स्वैपाकघराच्या उंबरठ्यावर बसून छाया तोंडानं आवाज करीत चिवडा खाऊं लागली.

"मीनाताई आली—" छाया ओरडली. अन् सर्वांच्या छातींत धस्स झालं. चूल पेटवणारी आत्या उडी मारूनच बाहेर आली. रात्र झाली होती नि मीना एकटीच आली होती.

"तारूताई कुठायत?" आप्पांनी विचारलं.

"घरीं गेल्या. घरापर्यंत बरोबरच होत्या माझ्या—"

मीना अपराध्यासारखी म्हणाली. सगळेजण जणूं तिच्या अंगावर आले होते नि त्यामुळें ती भेदरून गेली होती. डोक्यांत खोचलेलें चाफ्याचं फूल तिनं काढून घेतलं नि घाम फुटलेल्या मुठीत लपवलं. अन् मग वाचनालयांतून आणलेल्या रहस्यकथांच्या पुस्तकांकडे ती वेड्यासारखी बघूं लागली.

"तारूताई तशाच गेल्या?—आतपवतर यायला काय झालं होतं त्यांना?" आत्या कडवटपणें म्हणाली व स्वैपाकघरांत गेली. नलिनीलाही वाटलं होतं कीं तारूताई घरीं येतील, सगळ्यांशीं गोड, धीराचं बोलतील नि मग जातील. त्यांनी स्वतः केवढे भीषण प्रसंग पाहिले होते, अनुभवले होते. तिची फार इच्छा होती कीं तारूताईंच्या गळ्यांत पडावं नि म्हणावं, "ताई—काय झालं हो हें भलतंच!—"

मीना आपल्या छोट्या खोलींत गेली. तिच्या टेबलासमोरचं उत्तान कॅलेंडर वसंतानं सकाळींच फाडून टाकलं होतं. कॅलेंडरची रिकामी पांढरी जागा बघून मीनाचं मन आणखीनच शुष्क झालं. आपलं शिक्षण बंद करायची घरांत चाललेली भाषा, तिला आठवली. आपली काय



अनुक्रमणिका

काय विटंबना होणार आहे हे तिला कळेना. घरांतून पळून जायची कल्पना ती अनेक वेळां घोळवीत बसत असे. पण आतां पळून जावं असं तिला वाटेना. घराबाहेर गुंड, मवाली भरले आहेत अशी धास्ती तिनं घेतली.

"खोलींत काय करते आहेस? जेवायला चल—" वसंता ओरडला तेव्हां ती भानावर आली. आरशासमोर डोळे मिटून ती बलात्काराचीं दृश्यें स्वतःशीं रेखाटत होती. घाईनं तिनं पातळ बदललं व पाटपाणी घेतलं.

न बोलतां, निर्जीवपणें जेवणं चाललीं होतीं. आत्या वाढीत होती व बाकी सारी अन्न चिवडीत होती. जेवायचं नाहीं म्हणून म्हणत छाया हातपाय पसरून पडली होती. तिला समजवण्यांत अर्थ नव्हता! तिच्याकडे बघायचं टाळत जो तो घांस घशाखालीं ढकलीत होता.

"पाय वाजले कुणाचे?" भात वैरतां वैरतां आत्या दचकून म्हणाली.

"वेर्णेकर येणार होते—" मीना म्हणाली.

वसंता पानावरून उठून बंद दारापर्यंत जाऊन आला. कुणी आलं नव्हतं. आतेला उगाच भास झाला होता. वेर्णेकर येणार आहेत हें ऐकून आप्पांचा चेहरा कसातरीच झाला. आज वीस वर्षे वेर्णेकर ह्या घरांत येत होते. कारखानीसांचे फॅमिली डॉक्टर म्हणून. घरातली दुखणी अडचणी वेर्णेकरांनी निस्तरली होती. आप्पांच्या पत्नीचा मृत्यु, आप्पांचा मधुमेह, वसंताचा हात मोडला होता तेव्हांच मालीश, नलिनीचं......सगळयांना वेर्णेकरांचा आधार होता.

तरी पण वेर्णेकरांना हे नवं, गलिच्छ, गृहच्छिद्र माहीत असावं, त्यावर त्यांनी वारंवार हक्कानं बोलावं, आपण शरमून जावं, हे आप्पांना आवडेना, वेर्णेकरांचं नांव ऐकलं कीं त्यांचं तोंड कडू होई. आतांही ते पानावरून तसेच उठले.

बाहेर किर्रर अंधार होता. वेर्णेकर आतां येतील असं वाटत नव्हतं. भडसावळयांच्या बंगल्यातही दिवे नव्हते. त्या शुकशुकाटानें, भयाण शांततेनं आप्पांना बरं वाटलं. छायेला त्यांनी धीराने उचललं व पलंगावर ठेवलं अन् तिच्या निद्रित, शांत मुद्रेकडे ते पापणी न लवतां वेड्यासारखे पाहात बसले.

मीना पलंगावर आडवी झाली व रहस्य कथांच्या कुशीत गेली. तिसऱ्या प्रकरणांतच बलात्कार होता. मीनाला ते वाचवेना, निपानही उलटवेना. ती पुस्तक दुमडून तशीच आढ्याकडे पहात राहिली. हळूहळू तिच्या हृदयांत भीति भरूं लागली. कसल्याशा भयंकर दुःखानं ती कासावीस झाली. भूल दिल्यावर खाली खाली गेल्यासारखं वाटतं तसं तिला कुणाच्या मिठींत घट्ट घट्ट आवळल्या सारखं होऊं लागलं.

खोलीचं दार उघडं ठेवून मीना झोपली हे पाहून वसंत भडकला. त्यानें दार लोटून घेतलं व तो निजण्याच्या खोलींत गेला. बहिणीला पत्र लिहायचा बेत नलिनीनं रद्द केला व ती रेडियोकडे निघाली होती. नवऱ्याला बघतांच ती थबकली. त्याला हल्ली रेडियो लावलेलं आवडत नसे. सिनेमातली उत्तान गाणीं ऐकली कीं तो भडके. नलिनीने केविलवाण्या नजरेनं वसंताकडे पाहिलं. मग अभावितपणें

ती त्याच्याकडे गेली. खांद्यावर मान टाकून म्हणाली, " काय भयंकर झालंय हो !—" ,

आत्यानं स्वैपाक घर बंद केलं. घरांच्या कड्या लावलेल्या पाहिल्या व ती छायेजवळ आडवी झाली. झोपेत हंसणारी छाया पाहून आतेच्या छातीत कससंच झालं ! पलीकडे मीनी घोरत होती; नि तिकडे नलिनी रडत होती. लहानपणींच नवरा मेलेल्या आतेला सगळ्या-जणींचा चमत्कार वाटूं लागला; नि सगळ्यांबद्दल अपार अनुकंपा वाटूं लागली. कारखानीसांचं घर डागळलं म्हणून ती हळहळली. राम-राम जपत झोपेची आराधना करूं लागली.

हळुहळूं ते डागळलेलं, विटाळलेलं घर भितीनें, दुःखानें थकून, लाचारपणें झोपेच्या आधीन झालं. त्या दचकलेल्या माणसांच्या डोळ्यांपुढें आतां वेडीवाकडी भुतं नाचूं लागली.

...मध्यरात्री कधीतरी छाया झोपेंतून जागी झाली. तिची झोप आटोपली व उघड्या डोळ्यांनी ती चोहोंकडे बघूं लागली. दूर टिटवी ओरडत होती आणि सगळं घर शांत झालं होतं. हळूहळूं छायेला अंधारांत दिसूं लागलं. खोलींतल्या वस्तू अस्पष्ट आकार घेऊं लागल्या शेजारी आत्या घोरत होती. तिच्या डोक्यावरचा पदर दूर गेला होता. पलीकडे आप्पा कपाळावर हात टाकून पुतळ्यासारखे पसरले होते. शेजारच्या खोलींत मीनाताई कूस बदलत होती. कोपऱ्यांत वसंतदादा नलिनी वहिनीची झोपण्याची खोली होती. सगळे झोपले होते. दिवस-भर चिडचिड करून छायेला हिडीसफिडीस करून ! तिच्याकडे विचित्र तऱ्हेनं पहात ! सगळीकडे छायेनें मान फिरवून पाहिलं, नि मग खिडकीतून रस्त्याच्या वळणावर तिची नजर गेली. तिच्या भुंवया संकुचित झाल्या आणि छोट्या डोक्यांत भलं मोठं कोडं भरूं लागलं. कोपऱ्यावरच्या गराजमध्यें त्या फुगेवाल्या माणसानं आपल्याला बोलावून नेलं—अन् फुगे देण्याऐवजीं आपल्याला धरलं, घट्ट घट्ट धरलं, नि वेड्यासारखं घाणेरडं कांहींतरी केलं ! कां—कशाला ? कां तो असं वागला ? अन् तेव्हांपासून सगळेजण असं बावचळल्यासारखं भूत लागल्यासारखं कां करताहेत ? काय घडलंय् तरी काय !

• • •

( पान १७ वरून चालू )

बहुजन समाजाला पारखा होऊं लागला, तेव्हां महाराष्ट्राचा सहिष्णु भागवत धर्म गंगथडीच प्रस्थापित झाला. या धर्माचा संदेश अद्याप आदिवासीपर्यंत पोंचावयाचा आहे. आणि गोदावरी ही महाराष्ट्राची अन्नपूर्णा आहे. गोदावरीचा परिसर हें महाराष्ट्राचें अन्नवस्त्राचें कोठार आहे. तृषार्त आणि क्षुधार्त महाराष्ट्रभूमीची व भूमियांची तहान भूक भागविणें ही अर्वाचीन महाराष्ट्राची समस्या आहे. गोदाकांठीं गोदावरीची मंदिरें जागोजाग आहेत पण धवल-श्वराचें धरण हें गोदावरीचें खरें मंदिर आहे. अशीं मदिरें जागोजाग उभारली तरच अन्न, पाणी व वस्त्र या बाबतींत महराष्ट्र स्वयंपूर्ण होणार आहे. आणि गोदावरी ही महाराष्ट्राची लक्ष्मी आहे. सातवा-हनांनी आमची साम्राज्य व स्वातंत्र्य परंपरा गोदावरीच्या परिसरांतच प्रस्थापित केली. आम्हांला आर्थिक उत्कर्ष त्यांच्याच आमदानींत उपभोगावयास मिळाला. आणि गोदावरी ही महाराष्ट्राची सरस्वती आहे. सातवाहनांपासून यादवांपर्यंत, महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांनीं गोदावरीच्या परिसरांत लेणीं कोरून व तीं चित्रित करून आणि मंदिरें उभारून महाराष्ट्राची स्थापत्यपरंपरा प्रस्थापित केलेली आहे. गोदावरीची आद्य सामन्तिनी प्रवरा हिला अमृतवाहिनी म्हणण्यांत येते. कारण तिच्या कांठावर समुद्रमंथनानंतर मोहिनीनें अमृताचें वांटप केलें, अशी कथा आहे. कोण जाणे, पण एवढें मात्र खरें कीं प्रवरेच्या कांठावर ज्ञानेश्वरांना अमृताचा अनुभव प्राप्त झाला आणि त्यांनी ज्ञानेश्वरींतून महाराष्ट्रावर अमृताचें सिंचन केलें. त्यांनीं मराठी भाषेची, तत्त्वज्ञानाची व अस्मितेची प्रस्थापना केली. अंतर्वेदांत भगवान श्रीकृष्णांनीं अर्जुनाला भगवद्गीता सांगितली, हें खरें, पण ती आम्हांला दुरावली होती. ती ज्ञानेश्वरानीं आम्हांला उपलब्ध करून दिली; पंडिताच्या औद्धत्यानें नव्हे—माऊलीच्या वात्सल्यानें !

म्हणून गोदावरीला पुन्हां एकदां नमन करतों



*झळंबल्या आकाशाला...*

झळंबल्या आकाशाला
तुझ्या मौननिळ्या ज्वाळा
केंद्रांतून मांडलेला
खालीं जोहार सोहळा;
केस ओले पाठीवरी
काळ्या रात्रीचे मोकळे
चन्द्रकोरीचें केशर
भांगामधें रेखलेले;
स्पर्शहिरव्या चुड्याचा
नाद मावेना तालांत
उतावळीचीं पैंजणें
छंदकारलीं पायांत
किती उशीर लावाया
एक कुंकवाचें बोट...

—इंदिरा



अनुक्रमणिका

आपल्या तपोबलानें रोज प्रातःकाळीं गौतमऋषि साळीची पेरणी करी, आणि दोन प्रहरांत पीक तयार होई. त्याच गौतमाच्या हातून गोहत्या झाली. या पापांतून निवृत्त व्हायला त्यानें अघोर तपश्चर्या केली. आणि त्याची योग्यता जाणून श्री शंकरानें त्याला गंगा दिली तीच ही—



# दक्षिण गंगा गोदावरी

स. आ. जोगळेकर

हिंदुस्थान हा देश जसा व्यवसायाच्या दृष्टीनें कृषिप्रधान, तसाच संस्कृतीच्या दृष्टीनें ऋषिप्रधान आहे. त्यांच्या सहकार्यामुळें आणि साहचर्यामुळेंच, आमच्या सामान्य माणसांना साध्या विषयांत पारमार्थिक आशय आढळतो. आपल्या नद्यांचेच पहा ना– देशोदेशींचे लोक नद्यांना ललाटरेषा मानतात. कारण विशेषतः कृषिप्रधान देशांत त्यावरच देशाचे दैव व समृद्धि ही अवलंबून असतात. आम्ही त्यांना ललाटरेषा तर मानतोच, शिवाय त्यांच्या अंगीं कांहीं विशिष्ट गुण आहेत असें कल्पून त्यांचीं कर्तृत्वें निश्चित करतो. आम्ही त्यांना देशांच्या देवता व जनतेच्या माता मानतो. त्यांना मूर्तस्वरूप देतो आणि त्यांची पूजा करतो. प्रातःकाळीं त्यांचे स्मरण करतो आणि अर्घ्यप्रदान करतांना त्यांना आवाहन करतो. आम्ही म्हणजे आमच्यापैकीं काव्य किंवा प्रार्थना प्रवृत्त सुसंस्कृत, एवढेच नव्हे, ज्यांना शिक्षणाचे संस्कार झालेले नाहींत अशी सामान्य माणसेंही. नदीकिनाऱ्यावर आम्ही आमचीं तीर्थें मांडतो, तेथे घाट व देवळे उभारतो आणि यात्रा भरवतो. अशा तीर्थक्षेत्रीं आम्ही नदींत स्नान करतो, प्रसंगानुरोधानें व शक्त्यनुसार नदीला नारळ, दिवा आणि साडीचोळी अर्पण करतो. नद्यांचे ध्यान व पूजन हे आमच्या देशाचे, आमच्या जनतेचे व आमच्या संस्कृतीचे एक वैशिष्टय आहे.

ही प्रथा कितीशी पुरातन आहे ? कमीत कमी ऋग्वेदकाला-इतकी; ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत सरिता–सूक्त आहे. त्यांतल्या कांहीं ऋचा सांगतों :

हे आपोदेवींनों, तुमच्या माहात्म्याची प्रशंसा कविजन यज्ञगृहांत करीत आहेत...हे सिंधु, तुला वाहतां यावे म्हणून तुझ्यासाठीं वरुणानें मार्ग खोदून दिला आहे. ही सिंधू अपराजित आहे; उत्कृष्ट अश्वांची व उत्कृष्ट रथांची स्वामिनी आहे; उत्तम वस्त्रविभूषित, सुवर्णवर्णी, पुण्यवती आणि सत्त्वसंपन्न आहे.

ऋग्वेद काळांत सिंधूला विशेष महत्त्व होते. या सूक्तांत गंगा, यमुना आहेत, पण त्यांचे महत्त्व दुय्यम दर्जाचे आहे. उत्तर कालांत गंगा-यमुना दुआब हें आर्यांच्या सुसंस्कृतीचे केंद्र बनले. जें जें पवित्र त्याचें गंगा हे प्रतीक झाले. म्हणूनच स्नान करतांना, नदीच्या पाण्यांत बुडी घेतांना श्वास कोंडण्यापूर्वी किंवा पृष्ठभागावर आल्यानंतर आपण उद्गारतों, हर गंगे भागिरथी !

कालांतराने आर्यांच्या दक्षिणापथांत विस्तार झाला. हिंदुस्थान हा देश विस्तारानें खंडप्राय आणि सांस्कृतिक दृष्ट्या संकीर्ण असला तरी भौगोलिकदृष्ट्या हा प्रदेश एकात्म आहे हें प्रत्यक्ष प्रमाणांनीं पटलेले असल्यामुळें आमच्या प्राचीनांनीं जनतेच्या अंतर्यामावर देशाचे ऐक्य बिंबविण्यासाठीं परिस्थितीच्या अनुरोधानें आणि धार्मिक



अनुक्रमणिका

भावनांवर आधारलेले नवे नवे व निरनिराळे संकेत निर्माण केले. पैकीं सरिता संकेत आहे तो असा :

हे गंगे, हे यमुने, हे सरस्वती, हे नर्मदे, हे सिंधु, हे कावेरी— मी हा अर्घ्य अर्पण करीत आहे. ह्यांत तुम्ही समाविष्ट व्हा.

वेदकालीन सप्तसिंधूचा प्रदेश पंजाबापुरता मर्यादित होता. पुराणकालीन सप्तसिंधूचा प्रदेश सिंधूपासून कावेरीपर्यंत विस्तृत झाला होता. असाच सात कुलाचलांचा संकेत आहे. असाच बारा ज्योतिर्लिंगांचा संकेत आहे. हे संकेत द्वैतांतील अद्वैताचे द्योतक आहेत. परशुधर परशुरामाच्या पदस्पर्शांनें आसामपासून केरळ पर्यंतचा प्रदेश पवित्र झालेला आहे, असें आपण मानतो. ठिकठिकाणीं त्याच्या कर्तृत्वाच्या व निवासाच्या स्थानिक आख्यायिका कानीं येतात. हेहि संकेतच आहेत. महापुरुषांच्या चारित्र्याद्वारें देशाचे व जनतेचे सांस्कृतिक ऐक्य साधण्यासाठीं व सांधण्यासाठीं, प्रवर्तकांनीं हेतुपुरःसर प्रस्थापित केलेले आणि पुनःपुनरुच्चारामुळें रुढ झालेले.

भगीरथाच्या कर्तृत्वानें गंगा उत्तरेस हिमालयांत भूतलावर अवतरली म्हणून तिला भागीरथी म्हणतात. गौतमाच्या कर्तृत्वामुळें गंगा दक्षिणेत ब्रह्मगिरीवर अवतरिली म्हणून तिला गौतमी गंगा म्हणतात. दोघीहि शंकराच्या जटेंतून अवतरल्या, म्हणून सारख्याच पवित्र. भगीरथाची कथा प्रसिद्ध आहे. त्यानें गंगेसाठीं तपश्चर्या केली. ती, शापदग्ध सागर पुत्रांच्या उद्धारासाठीं. गौतमानें गंगेसाठीं तपश्चर्या केली ती गोहत्येच्या पापांतून मुक्त होण्यासाठीं आणि दुष्काळग्रस्त जनतेच्या परित्राणासाठीं. दक्षिण पथांत एकदां मोठा दुष्काळ पडला होता. त्र्यंबकेश्वराच्या परिसरांत मात्र सुबत्ता होती. कारण त्यानें वरुणाच्या कृपेनें अक्षय्य कुंड मिळविले होते. पर्वतांच्या पायथ्याशीं अशी कुंडें असतातच. रोज प्रातःकाळीं गौतम साळीचा पेरणी करी. तें पीक दोन प्रहरांत तयार होई. आणि त्यावर आश्रमवासी निर्वाह करीत. ग ौतमानें साळीचें बीज दक्षिणापथांत आणले असले पाहिजे. हें पीक फार लवकर तयार होते. गौतमाच्या हातून गोहत्या झालीया पापांतून निवृत्त होण्यासाठीं त्यानें शंकराची तपश्चर्या केली. गौतमाची योग्यता जाणून शंकरानें त्याला गंगा दिली. भागीरथी अंतराळांतून उतरली. तिला शंकरानें मस्तकी धारण केली. येथें शंकराला ब्रह्मगिरीवर जटा आपटून गोदावरीला मोकळी करावी लागली. त्या गंगेप्रमाणें या गंगेलाही मार्ग काढून द्यावा लागला. जागोजाग डोंगर भेदून, रन्ध्रें भरुन किनारे बांधून गौतमानें तिचा प्रवाह वाहता केला असावा. म्हणून गोदावरीला भूतलावर आणण्याचे श्रेय गौतमाला देण्यांत आलेले असावें. गंगाकांठचे प्राचीन आर्य हे यज्ञसंस्कृतीचे पुरस्कर्ते, हे पशुपाल, तसेंच क्षेत्रपाल होते, आणि मांसाहारी होते. गौतमकथेवरून वाटते कीं गोदावरीच्या परिसरांतच आर्यसमाज गोहत्येपासून परावृत्त झालेला असावा. पुष्कळ गाई देणारी असाही गोदावरी या संज्ञेचा एक अर्थ आहेच. शिवाय येथें गोवर्धन नांवाचे प्राचीन ठाणें आहेही.

कथांवरून व दंतकथांवरून दिसतें कीं दक्षिणापथांत आर्यांचा प्रवेश गोदावरी व तिच्या सामन्तिनी यांच्या परिसरांतूनच झालेला आहे. विश्वामित्राचे पुत्र आर्यावर्तातून बहिष्कृत झाले, व ते याच प्रदेशांत स्थिरावले. विंध्य ओलांडून अगस्ति आला व प्रथम विदर्भात स्थायिक झाला. स्थानिक दंतकथा त्याचे आश्रम जागोजाग दाखवितात. त्यांवरुन अनुमान होते कीं नाशिक अकोल्यावरुन, कावेरीवरून, कन्याकुमारी नजीकच्या अगस्त्येश्वराकडे तो गेला असला पाहिजे. आर्य गोदावरीच्या परिसरांत आले तेव्हां गुरु सिंह राशीवर असावा आणि ते कृष्णेच्या परिसरांत विस्तारले तेव्हां गुरु कन्या राशीत असावा. परशुराम कथा या भागांतील क्षत्रियांच्या असहिष्णु व आक्रमक वृत्तीची आणि ब्राह्मण–क्षत्रिय स्पर्धेची द्योतक आहे. परशुराम कथा वैनगंगेच्या परिसराशीं संबद्ध आहे. या भागांत अनादि कालापासून आदिवासींची वस्ती आहे. परशूनें वृक्ष तोडून व ते पेटवून जमीन भाजायची आणि नंतर तीवर पीक काढायचे, ही पद्धत त्यानेंच या भागांतील स्थायिक अनार्यांना शिकविलेली असणें शक्य आहे.

दक्षिणापथांत गोदावरीचें महत्त्व अद्वितीय आहे. संकल्प सांगतांना गोदावरीचा उल्लेख करावा लागतो. भाविक लोक गोदावरीला दक्षिण गंगा म्हणतात आणि नाशिकला दक्षिण काशी. सर्व तीर्थें सिंहस्थांत गोदावरीच्या आश्रयाला येतात. भाविक लोक गंगास्नानापेक्षां गोदास्नान अधिक पुण्यप्रद मानतात. पाप क्षालनार्थ खुद्द गंगा येथे स्नानाला येते अशी कथा आहे. गोदावरी ही उगमापासून मुखापर्यंत पवित्र आहे. उगमाजवळ नाशिकच्या परिसरांत आणि मुखाजवळ सप्त गोदावरी प्रदेशांत तर विशेष पवित्र आहे. प्रभु रामचन्द्राच्या पदस्पर्शाच्या श्रेयांत हे दोन्ही भाग स्पर्धक आहेत. गोदावरी सातमुखांनीं समुद्राला मिळते, तेथें प्राचीनांनीं आद्य गोत्रकर्त्या ऋषींचे आश्रम स्थापन केले आहेत.

हे सारें खरें असेलही. पण गोदावरीला वृद्ध गंगा का म्हणतात ? ही पोटभरू पौराणिकांची कांहीं योजना आहे कीं औद्धत्याबद्दल कुविख्यात असलेल्या दाक्षिणात्यांचा हा अभिनिवेश आहे ? तसे कांहीं नाहीं. गोदावरी ही खरोखरच गंगेपेक्षा ज्येष्ठ आहे.

आर्य दक्षिणेंत आले ते सिंधुगंगा मैदानांतून; त्या प्रदेशाचे व त्यांवरुन वहाणाऱ्या नद्यांचें त्यांनीं भूगोल व भूगर्भशास्त्रांच्या दृष्टीनेंहि निरीक्षण केलेलें होतें. येथें आल्यावर त्यांच्या प्रत्ययास आलें कीं सह्याद्रीचें पठार हाच हिंदुस्थानचा पुराण प्रदेश आहे, आच आधार आहे, की त्यांनीं परम पवित्र मानलेल्या गंगेहून गोदावरी प्राचीन आहे आणि या परिसरांतील वस्तीही आद्य आहे; म्हणूनच त्यांनीं वृद्धगंगा हें वैकल्पिक अभिधान अर्पण केलें. अर्वाचीन भूगोलशास्त्रही सांगतें कीं ज्या नद्या अद्याप दऱ्याखोऱ्यांतून वहात आहेत त्या बाला आणि ज्यांनीं आपल्या प्रवाहानें उगमस्थानाच्या पर्वतांचा भुगा केला आहे आणि आतां ज्या पठारावर उगम पावतातशा दिसतात त्या प्रौढा. गोदावरीचा उगम ब्रह्मगिरीवर होतो हें आतां केवळ पुराणांत वाचायचें. तिचा लौकिक उगम त्र्यंबकेश्वराच्या परिसरांतच होतो, याचा दृक्प्रत्यय कोणालाही घेता येतो.

आणि गोदावरी ही महाराष्ट्राची माता आहे. विदर्भ, मराठवाडा व देश हे महाराष्ट्राच्या पठाराचे तीन्ही प्रदेश गोदावरी व तिच्या सामन्तिनी यांनीं परस्परांशी जोडलेले आहेत. गोदावरीच्या परिसरांतील आदिवासी जमातीचे अद्याप मराठीकरण व्हावयाचे आहे. कर्मकाण्डाचे महत्व व ब्राह्मणांचें धार्मिक प्रस्थ वाढल्यामुळें धर्म-

[ पान १५ पहा ]

वेची रेळे माझा निरोप घेऊन केव्हां गेला तें मला कळलंच नाहीं; कारण जातांना तो इतका मोठा होत गेला कीं मीं त्याच्या बुटाइतक्या उंचीचा झालों होतों.



# गलीव्हर

—शं. ना. नवरे

घड्याळांत सहा वाजले तेव्हां मीं हेडक्लार्क कानड्यांकडे हळूच नजर टाकली. कचेरी सुटून अर्धा तास होऊन गेला होता तरी त्यांची समाधी भंग पावली नव्हती. त्यांचं काम जोरांत चालू होतं. दुपारचा राग अजूनहि त्यांच्या चेहऱ्यावर ठाण मांडून होता.

वास्तविक इतकं रागावण्यासारखी कांहीं चूक मीं केली नव्हती. आमच्या कचेरींत अशा चुका नकळत घडत असतात, त्या मुकाट्यानं गाजावाज़ा न करतां सुधारल्याहि जात असतात. पण मीं रजेसाठीं केलेला अर्ज हेडक्लार्कना आवडला नव्हता आणि त्याचा राग काढण्यासाठीं कांहीं ना कांहीं कारण शोधणं त्यांना क्रमप्राप्तच होतं. माझ्या चुकीमुळं त्यांना ती संधि मिळाली होती नि त्यांनीं तिचा (अ)योग्य तो उपयोग करूनहि घेतला होता.

मीं पुन्हां कानड्यांकडे नजर टाकली नि त्यांच्या रागाचा अंदाज घेतला; कचेरी आतां सोडतां येईल कीं नाहीं हें कळायला तोच एक मार्ग होता.

आपल्यावर खिळलेली माझी नजर ओळखून त्यांनीं घड्याळाकडे पाहिलं नि मला म्हटलं, " सतर्षी, जा आतां. अधिक थांबून कांहीं दुपारची चूक सुधारतां येणार नाहीं. पुन्हां मात्र अशा चुका करून रजेचा अर्ज पाठविलांत तर मी तो सरळ फाडून टाकीन. "





अनुक्रमणिका

कांहींहि न बोलतां मीं माझं टेबल आवरलं नि दुसऱ्या दिवशीं करायच्या कामाचा आढावा घेत कचेरीच्या बाहेर पाऊल टाकलं.

बस स्टॉपजवळ येईपर्यंत मला सारखी ती क्षुल्लक चूक आठवत होती, कानड्यांचे बोचरे शब्द आठवत होते नि वाटत होतं, आपलं आयुष्य शून्य किंमतीचं आहे! कानड्यासारख्या कुणाहि मूर्खानं आपल्याला चाहेल तें बोलावं, आपला वाटेल तसा अपमान करावा म्हणजे काय? ही नोकरी कसली? मिळणारा पगार कसला? यापेक्षां रस्त्यावरला हा भिकारी सुखी आहे. हा गजरे विकणारा पोरगा सुखी आहे, हा बसड्रायव्हर सुखी आहे...

माझा संताप अनावर झाला. कानडे समोर दिसले असते तर त्यांना मी याचा जाब विचारला असता नि शेवटीं म्हटलं असतं, "कानड्या—"

माझ्या तोंडांतली अर्वाच्य शिवी तशीच अडखळली.

—कुणीतरी माझ्या पाठीवर हात ठेवला होता नि त्यानं मला प्रश्न केला होता, "काय सतर्षी, ओळखलंस का मला?"

कांहीं क्षण असेच निघून गेले. डोक्यांतला राग नाहींसा व्हायला तेवढा वेळ हवाच होता. आणि मग मी त्या थुलथुलीत शरीराच्या इसमाला ओळखलं. तो बेबी रेळे होता.

बेबी रेळे! कॉलेजांत असतांना होता तसाच गलेलठ्ठ नि हंसतांना हिरड्या दाखवणारा.

आमच्या कालेजांत दोन रेळे होते. एक होता एस. पी. रेळे नि दुसरा बी. बी. रेळे, ह्या दुसऱ्याला आम्हीं गंमतीनें बेबी रेळे म्हणायचे.

"ओळखलंस का मला?" त्यानं माझ्या पाठीवर पंजा रोवून पुन्हां विचारलं.



"अर्थात् तूं बेबी रेळे ना?"

असं मी म्हटल्यावर तो हिरड्या दाखवीत नि शरीर गदगदून हलवीत हंसला. म्हणाला, "बस्स! तूं मला ओळखलंस याची खात्री पटली."

"इकडे कुठं तूं?" मीं त्याला विचारलं, "इथं फोर्टमध्येंच नोकरीला असतोस कीं काय?"

"छेः नोकरीला कुठंच नाहीं."

"म्हणजे?"

"म्हणजे काय? नोकरी सुटून दोन महिने झाले. अर्ज केले आहेत दोनपांच ठिकाणीं. बघायचं आतां. ह्या दिवसांत कुठं नोकरी मिळायला?"

तों हें इतक्या तटस्थतेनं म्हणाला कीं त्यानं बरेचसे नकार पचविलेले दिसले.

मी उगाचच म्हटलं, "त्याचं कांहीं सांगतां येत नाहीं."

"तें तर झालंच. आपण आपलं कर्ज करीत रहायचं. आज इथं इंटरव्ह्यूला आलों होतों एका ठिकाणीं."

"कसा काय झाला इंटरव्ह्यू? Any hopes?"

"अगदीं शून्य. आम्हांला अकरापासून जें थांबवून ठेवलं तें आत्तां सोडलं. जवळ जवळ शंभर जणांना बोलावलं होतं. केव्हां कुणाला बोलावतील नेम नव्हता. चहाला का कशाला बाहेर जातां आलं नाहीं. आपण चहाला म्हणून जायचं नि आपलं नांव पुकारलं जायचं म्हणजे खलास. माझा नंबर पांच वाजतां लागला. दिवसभर कंटाळलों होतों. पोटांत पाण्याचा थेंब नव्हता. कांहीं उत्तरंच सुचेनात. इंटरव्ह्यू अगदीं होपलेस झाला. कांहीं आशा नाहीं. आतां दुसऱ्या ठिकाणची वाट पहाणं!"

त्यानं आपल्या पॅंटच्या खिशांत हात घातला. नि जराशानं रुमाल बाहेर काढला. त्यानं तेवढ्यांत बहुधा आपलं पाकीट असल्याची खात्री करून घेतली होती. मग सहज असं तो म्हणाला. "फार तहान लागली आहे. चहाला येणार?"

"नको."

"अरे चल. इतक्या वर्षांनीं भेटतो आहेस. आणि मला कुणीतरी बरोबर हवं आहे चहाला. एकट्यानं चहा प्यायला आवडत नाहीं मला."

दोन महिने नोकरी नसली कीं मनुष्य किती लाचार होतो, कुठली ओळख दाखवतो कांहीं सांगतां येत नाहीं. माझ्या पाठीवरला त्याचा पंजा मला सांगूं लागला कीं त्याला चहाचे पैसे द्यायला कुणी तरी हवं होतं.

मी त्याच्याबरोबर निघालों.

आम्हीं एका हॉटेलांत शिरलों. तिथं जाईपर्यंत मी माझ्या जवळच्या पैशांचा हिशेब केला होता नि रेळेसाठीं रुपयाभर खर्च करायचं ठरवलं होतं.

टेबलाशीं बसल्यावर रेळेनं पदार्थांची यादी वाचली नि मला विचारलं, "तूं चहाच घेणार नुसता कीं कांहीं खायला घेशील?"

माझा पहिला अंदाज बरोबर ठरला होता! "मी नुसता चहाच घेईन. तूं खा वाटलं तर. दिवसभर कांहीं खाल्लं नाहींस तूं."

[anchor: अनुक्रमणिका]






त्याचा डाव ओळखल्याचं मीं जराहि दर्शवलं नाहीं.

त्यानं आपला पंजा पुन्हां माझ्या हातावर दाबला नि म्हटलं, "तूं जर कांहीं घेतलं नाहींस तर मीहि घेणार नाहीं."

कांहींहि न बोलतां मीं वेटरला बोलावलं नि चहा आणि केक आणायला सांगितलं.

वेटरनं केकची बशी टेबलावर ठेवल्याबरोबर रेळेनं त्यांतला मोठ्यांतला मोठा केक उचलला नि त्याच्या भोवतालचा कागद काढायला सुरवात केली.

मी त्याच्याकडे कुतुहलानं बघत होतों.

त्यानं तो केक संपवला नि लगेच दुसरा उचलला. मी कांहीं खात नव्हतों हें त्याच्या लक्षांतहि आलं नव्हतं.

चारपांच केक खाल्ल्यावर त्यानं पाण्याचा ग्लास तोंडाला लावला नि तो रिकामा करून खालीं ठेवला.

रेळे पुन्हां हिरड्या दाखवत हसला नि म्हणाला, "आतां जरा बरं वाटलं बघ. अरे, रोज दुपारीं जेवायची संवय. आज जीव जातोय कीं रहातोय असं होऊन गेलं होतं."

त्याचं तें अधाशासारखं खाणं पाहून मला दया आली. वाटलं, महिना संपायला अवकाश आहे, माझ्या खिशांत पैसे आहेत हें बरं झालं. हा जर आणखी दहाबारा दिवसांनीं भेटला असता तर त्याला पोटभर खायला घातल्याचा आनंद मला लाभला नसता. आज जर मी ह्याला भेटलों नसतों तर ह्यानं आपली भूक चण्यांवर भागवली असती!

मग तो म्हणाला "आणखी कांहीं मागवायचं आहे का?"

"मला नको आहे."

"घे रे इथं समोसे फार चांगले मिळतात नि ह्या गोड केक्सवर लगेच चहा बरा लागायचा नाहीं कांहींतरी तिखट हवं."

त्यानें वेटरला बोलावून समोसे आणायला सांगितले.

आतां मात्र मला त्याची थोडीशी चीड आली. माझ्या खिशांत पैसे असतील असं समजून हा खुशाल खात होता, मलाच आग्रह करीत होता. जरा बेळानं हा माझ्याकडे कांहीं पैसे उसने मागेल तेव्हां त्याला स्पष्ट नकार द्यायच असं मीं ठरवून टाकलं.

त्यानं मग मला विचारलं, "तूं कुठं असतोस नोकरीला?"

मी आमच्या कंपनीचं नांव सांगितल्यावर तो म्हणाला, "म्हणजे खाजगीच दिसतेय् नोकरी. कंपनी बरी आहे का?"

"चांगली आहे."

"पगार किती मिळतो?"

त्याला त्याच्यांतला नि माझ्यांतला फरक फार जाणवूं नयें म्हणून मी माझ्या पगारांतले पन्नास रुपये कमी करून त्याला म्हटलं, "मिळतात दोनशें रुपये."

"म्हणजे फारच कमी आहे रे!—नि किती वर्षं नोकरी झाली?"

"झालीं चारपांच वर्षं!"

"गुड् गॉड! आणि दोनशेंच फक्त?"

त्यानं असं म्हटलं कीं जणुं कांहीं त्याला पाँचसातशें रुपयें पगार होता. मला त्याच बोलणं आवडलं नाहीं.

मीं मुद्दामच म्हटलं, "हल्लीं मिळताहेत कुठ नोकऱ्या! तूंच पहातो आहेस ना, काय टंचाई आहे नोकऱ्यांची ती! त्या मानानं I am very lucky. दर महिन्याला दोनशें का होईना, पगार हातीं पडतोय्."

रेळेला माझ्या नोकरीबद्दल, पगाराबद्दल सांगतां सांगतां मी मोठा होऊं लागलों. मला वेळच्या वेळीं मिळणारा पगार, कायम नोकरी, पगार वाढ, पुढंमागं हेडक्लार्कची जागा मिळण्याचा संभव...रेळेच्या मानान मी सुखी होतों. फार सुखी होतों.

...माझ्या बुटाएवढ्या उंचीच्या रेळेकडे मीं पाहिलं नि मला त्याची दया आली. दोन महिने बेकारी काढणारा थुलथुलीत देहाचा तो रेळे...रस्त्यांत ओळखीचे चेहरे शोधणारा...त्यांच्याकडे चहा मागणारा...त्यांच्या पैशान लाचारीनं केक्स खाणारा...

मीं त्याला विचारलं. "लग्न-बिग्न कांहीं केलं आहेस का?"

"हो तर!" तोंडांत समोसा ढकलीत तो म्हणाला, "दोन मुलं आहेत मला. एक मुलगा, एक मुलगी."

"आणखी कोण आहे घरीं?"

"आई आहे. वडील गेल्या वर्षींच वारले."

"मग घरचं तुलाच बघावं लागत असेल. कां आहे कुणी मोठा भाऊ?" मी त्याच्या परिस्थितीचा अंदाज घेऊं लागलों.

"नो बडी! मी एकटाच."

नि तो पुन्हां सगळं शरीर हलवीत हसला.

मला त्याची कींव आली. मी जर त्याच्या जागीं असतो तर एव्हांना वाकून गेलों असतों. डोक्यावर एवढ्या कुटुंबाचा बोजा ठेवून किंचित्‌हि हंसू शकलों नसतों.

अशा माणसांच्या बायकांचे फार हाल असतात. नवऱ्यानं बेजबाबदारपणें झुगारलेला संसार सावरतां सावरतां त्या टेकीला येतात. मला रेळेच्या बायकोची दया वाटूं लागली. ती कसा संसार ओढत असेल? घरभाडं, दूधवाला, वाणी, मुलांचीं आजारपणं...



गिरगांवांत ट्रॅमनं जातांना मी एक-दोनदां ह्या रेळेला रस्त्यावरल्या एका इमारतीच्या गॅलरींत नाईटलेंग्यांत उभा राहिलेला पाहिलं होतं. तिथं जर तो रहात असेल तर त्या जागेचं भाडंच पाऊणशें ऐशीं रुपये

असेल. दोन मुलांपुरतंच दूध म्हटलं तरी महिना वीस पंचवीस रुपये हवेत...वाण्याचे साठ ते सत्तर रुपये...मी मनांतल्या मनांत आंकडे मांडूं लागलों...

छेः ! ह्या थुलथुलीत देहाच्या, हिरड्या दाखवीत हंसणाऱ्या रेळेची परिस्थिती फार कठीण होती ! मी फार सुखी होतों मग. दो...न...शें...प...न्ना...स...पगार घेणारा मी...

मी आणखी मोठा झालों.

...माझ्याकडे बघतांना रेळेची मान मोडायला आली. तो छोटासा रेळे...त्याची छोटी पत्नी...दोन छोटीं मुलं...तो संसार...

मीं खालीं वांकून रेळेच्या कुटुंबाला तळहातावर घेतलं.

ह्या लहानशा रेळेसाठीं मला कांहींतरी करायला हवं होतं. मी एकट्यानेंच इतकं मोठं होणं चांगलं नव्हतं. आपल्या उत्तम स्थितींत आपण गरीबांना विसरणं योग्य नव्हतं. आपण आपला मोठेपणा त्यांना देऊं शकलों नाहीं तरी त्यांच्यासाठीं तो वापरला पाहिजे होता.

ह्या बिचाऱ्यासाठीं काय करावं ? ह्याला कुठं नोकरी मिळवून द्यावी ?

मी रेळेकडे पाहिलं.

त्यानं खिशांतून कॅप्स्टनचं पाकीट बाहेर काढलं नि अेक सिगरेट शिलगावली.

अचंबा करीत मीं मनाशीं म्हटलं, ह्याला अजून परिस्थितीची कल्पना आली नाहीं कीं काय ? मला अडीचशें रुपये मिळत असूनहि मी ही उंची सिगरेट कधीं घेऊं शकत नाहीं !

कांहीं जणाना हलाखीत आपला रुबाब विशेष दाखवावासा वाटतो. लोकांना फसवायला नि ते फसले कीं स्वतःलाहि फसवून घ्यायला !

...पण हें परवडतं कसं ह्या रेळेला ?

एवढ्यांत मला आमच्या कचेरींतल्या नंदू ठाकूरची आठवण झाली. महिन्याला सव्वाशें रुपये मिळविणारा नंदू आपल्या श्रीमंत नातेवाईकांच्या वस्तु आपल्या म्हणून नेहमीं वापरीत असतो ! त्या नंदूसारखाच रेळेहि कुणातरी श्रीमंत नातेवाईकाचं चोरलेलं सिगा-रेटचं पाकिट वापरीत असावा.

—माझ्या तळहातावरल्या त्याच्या कुटुंबाकडे पहात मी म्हणालों, ' हा रेळे महामूर्ख आहे. डोक्यावर इतका बोजा असतांना हा इतका खोटा रुबाब दाखवून काय करणार आहे ?....आणि मला म्हणतोय् दोनशेंत तुझं काय होणार म्हणून ! '

त्याच्या दिमाखाचं मला हंसूं आलं. मीं म्हटलं, " तूं नेहमीं कॅप्स्टन् ओढतोस का ? मला तर कॅप्स्टन्नं गरगरतं. "

माझ्या प्रश्नाचं उत्तर देण्याऐवजीं रेळेनं नुसतं ' हूं ' केलं.

त्या ' हूं 'चा अर्थ कोणताहि व्हावा !

त्याच्या सगळ्या खोट्या रुबाबाचं कौतुक वाटण्याऐवजीं मला त्याची कींव आली. आपलं पूर्वीचें ऐश्वर्य दाखविण्याची त्याची केविल-वाणी धडपड चालली होती. या धडपडीसाठीं लागणारा पैसा तो माझ्यासारख्या नोकरीदार माणसांकडून कर्जाऊ म्हणून घेत असणार ! आत्तांच्या खाण्याचं बिल मीं दिलं कीं हा माझ्याजवळ पैशाची मागणी करील कीं काय असं मला वाटूं लागलं. त्या मागणीला नकार देण्याऐवजीं विषय बदलून पहावा म्हणून मीं विचारलें, " तूं आतां काय करणार आहेस ? दुसरीकडे कुठं नोकरी मिळण्याची शक्यता आहे ? "

" तशी शक्यता कांहीं दिसत नाहीं. तुला कुठं खटपट करतां येईल का ? तुझ्या कंपनींत—"

" बघेन खटपट करून. कांहीं जागा भरायच्या आहेत आमच्याकडे. "

" Thank you very much. नोकरी मिळाली कीं बायकोची किरकिर तरी संपेल !"

त्याच्या बायकोची मला आतां इतकी कींव वाटूं लागली कीं वाटेल तें करून त्याला नोकरी मिळवून द्यायची असा मी निश्चय केला. कंपनींत कुणाजवळ चौकशी करावी, कुणाचा वशिला लावावा याचा मी विचार करूं लागलों.

त्याला नोकरी मिळालीच पाहिजे. एकट्यानंच सुखी होण्याचा आपल्याला अधिकार नाहीं. आपण त्या गरीबाला मदतीचा हात दिला पाहिजे. त्यानं जन्मोजन्मीं आपलं ऋण आठवलं पाहिजे... त्याला समजलं पाहिजे कीं नुसत्या बेकार दिखाऊ रुबाबानं कांहीं होत नसतं; त्यासाठीं माझ्यासारखा पगारदार, कायम नोकरीवाला मनुष्य असावा लागतो !

आमचं खाणं संपलं होतं. आम्हीं उठलों. रेळेनं पुढं होऊन पाकिटांतून दहाची नोट ऐटींत काढली नि आपल्याजवळच्या दहाच्या शेवटच्या नोटेनं रुबाब दाखविण्याचा पुन्हां एकवार प्रयत्न केला.

मी त्याचा हात दूर केला नि पैसे दिले.

" तूं कशाला दिलेस पैसे ? " असं संभावितपणें म्हणायला तो अर्थात्च विसरला नाहीं.

" मी दिले म्हणून काय झालं ? "

" मीं तुला चहाला बोलवायचं नि तुला बिचाऱ्याला पैसे भरायला लावायचें हें कांहीं खरं नाहीं. "

माझ्याबद्दल काळजी करण्यापेक्षां ह्या शहाण्यानं स्वतःबद्दल काळजी करावी हें अधिक योग्य होतं !

—बाहेर आल्यावर त्याला परिस्थितीची कल्पना देण्यासाठीं म्हणूस मी म्हटलं, " सध्यां नोकरीची टंचाई तूं पहातो आहेसच. पण मी आमच्या कंपनींत खटपट करीन. काम फार असतं, साहे-बांच्या कटकटी देखील फार असतात पण तें विसरून जायचं. झालेला अपमान अगदीं मुकाट्यानं गिळून टाकायचा. परिस्थितीच आहे अशी. आतां माझंच बघ ना. मला इतका थोरला पगार मिळतो पण तो सुखाचा आहे का ? साहेबाच्या शिव्या आहेत. काम तर वाढतंच आहे. कधीं कुणा नातेवाइकाकडे जायचं म्हटलं, नाटक–सिनेमाला जायचं म्हटलं तरी वेळ मिळत नाहीं ! "

" अरे अरे ! काय हाल आहेत रे ! "

माझ्या बोलण्याचा त्याच्यावर थोडा परिणाम झालेला दिसला. मीं पुढें म्हटलं,

" शनिवारीं संध्याकाळपर्यंत थांबावं लागतं. रविवारींहि यावं लागतं—"

( पान ५८ वर पहा )

# चिंबोऱ्या

## मुडदुश्या

### अन् शेतकं

....एक चिंतन



— गोपाळकृष्ण भोबे

दारांत बाजार घेऊन आलेल्या बाईला सहज म्हणून मीं भाव विचारतों, आणि अनादिकालापासून ठरून गेल्यासारखी ती बाई सहजच उत्तरें देते–पापलेटं सव्वा रुपाया, कोलंबीचा वाटा बारा आणे, वीतभर कर्लीचा बाळा सव्वा रुपाया, पंधरावीस तिसऱ्यांचा वाँटा ८ आणे आणि चिंबोऱ्यांची जोडी दीड रुपया.

तिनें सांगितलेली किंमत मला तिडीक आणते. मीं दरवाजा लाऊन घेऊन तिला वाटेला लावायच्या बेतांत असतों; पण आंतून बांगड्यांच्या विचित्र आवाजाबरोबर तिरसट ध्वनी कानावर आदळतो, " मेलं किती दिवस शिवराक जेवायचं तें ? आपण कांहीं बाजारांत जात नाहींत आणि दारांत आला तरी तो घ्यायला नको ! "

" अग पण एवढ्याशा कोलंबीचे बारा आणे, आणि काड्याच्या पेटीएवढ्यासुद्धां नाहींत त्या चिंबोऱ्या त्यांची जोडी दीड रुपया ! आमच्या गांवांत..."

" हो हो माहित आहे तुमचा गांव ! तुमचा गांव राहिला दोनशें कोसावर ! ' माझ्या मामाच्या घरीं बारा म्हशी आणि मी काढते उठाबशी ' तशांतलीच गत. थांबग ए ऽ बाजारवाले...! " आणि ती सौदा काय पटवते काय घेते ईश्वराला माहित ! त्या दिवशीं पानांत पडलेले चिंबोरीचें दांगटें मी मुकाट्यानें खातो; परंतु मन मात्र गेलेले दिवस आठवत बसते. दीड रुपायाला आम्हीं टोपलीभर आणि शंभर माणसांन पुरेल एवढ्या चिंबोऱ्या आणल्या असत्या; परंतु दीड रुपयाचीं तरी काय गरज होती ? आरामखुर्चीवर पडल्या पडल्याच माझ्या डोळ्यांसमोर ' भिवऱ्या ' दिसूं लागतो.

" चल भिवऱ्या कुल्ल्याङ् येता ? " ( चिंबोऱ्या पकडायला येतोस काय ? ) कीं भिवऱ्या आपली लाल रुमालाची कास्टी घट्ट खोवून, हातांत पहार आणि इतर साधनं घेऊन धांवत यायचा. आमच्या घराच्या मागेंच सात आठ फर्लांगाच्या अन्तरावर खाडीच्या किनाऱ्याला आम्हीं जातो. माडाच्या लहानग्या कवाथ्यांच्या चुडितांच्या मधल्या भागाच्या, भिवऱ्या आपल्या धारदार कोयत्यानें लांबच लांब व्हावळ्या काढतो. त्या व्हावळ्या व्हाळांतल्या खाऱ्या पाण्यांत भिजवून मऊ करून मीं त्यांचे दोर बनवायला घेतों. तोंच भिवऱ्या कुठून तरी चार पांच बेडूक मारून आणतो. त्या बेडकांचें भाग करून तो त्या व्हावळ्यांच्या दोरीच्या टोंकाला घट्ट बांधतो. त्याला वितीच्या अन्तरावर एक दगड बांधतो. नुकतीच भरतीला सुरवात झालेली असते. इंचा इंचानें पाणी चढत असतें. आम्ही खाडीच्या किनाऱ्याला जाऊन ' हांस ' बांधलेलें दोर पाण्यांत टाकून किनाऱ्यावरच्या दगडांना ते दोर घट्ट बांधतां. भिवऱ्या पलीकडे पिंपळीच्या झाडीकडे पाहून हात जोडतो, आणि कांहीं तरी पुटपुटतो. दहा एक मिनिटांतच दोर ताणले जातात. झाऱ्याच्या आकाराचें तोंडाला खोलगट जाळी बांधलेलें एक ' कोबलें ' माझ्या हातांत आणि दुसरें भिवऱ्याच्या. हळुहळू ताणलेला दोर ओढून ' हांस ' खाण्याच्या गुंगींत असलेल्या चिंबोरीला हुलकावीत हुलकावीत कोबल्याच्या तोंडापर्यंत आणून, सटकन् कोबलें पाण्यांतून मी उचलतों. आपले दहा पाय झार्डीत चिंबोरी जाळ्यांतून

निसटायचा प्रयत्न करते. इतक्यांत आपलीही पकडलेली चिंबोरी घेऊन भिवऱ्या धांवत माझ्याजवळ येतो. माझे हात कांपत असतात, दोन्ही कोब्रलीं हातांत घेऊन भिवऱ्या तीं सपकन् उलटी जमिनीवर टाकतो. चलाखीनें चिंबोरीच्या पाठीवर पायाचा आंगठा दाबून धरून तिचे चावरे आणि हात फोडणारे डांगे तो कडाकड मोडतो, आणि राहिलेल्या आठ पायाच्या चिंबोरीला सहजगत्या उचलून तो गोणत्यांत भरतो.

पुन्हां दुसरे दोर ताणलेले असतात. भरती क्रमाक्रमानें वाढत असते. मी ओढत असलेल्या दोराला कोब्रल्याच्या तोंडाशीं आणतों, आणि माझा जीव थरथरायला लागतो. चिंबोरी ऐवजीं हिंचणानें ( पाणसापानें ) हांस पकडलेलें असतें. जोरजोरानें मी भिवऱ्याला हांक मारतों. भिवऱ्या धांवत येतो. कोब्रलें उलटें धरून त्याच्या दांड्यानें हिंचणाच्या तोंडावर धपाटे मारून तो हांस सोडवतो आणि हिंचणाला हुसकावून लावतो ! आपले कळीदार दांत दाखवत हांसत तो म्हणतो,

" हिंचणाङ् भियेताय बामणा ! "

आतां भरती पूर्ण झालेली आहे. बऱ्याच चिंबोऱ्या जमलेल्या आहेत; पण भिवऱ्याची समाधानी झालेलीं नाहीं. सगळ्या चिंबोऱ्या त्याने बारीक निरखून पाहिलेल्या असतात; पण ' लाखेची ' चिंबोरी आम्हांला गावलेली नसते.

" मेले सारे नर आहेत ! "

"नर कसा ओळखायचा रे ? " मी भिवऱ्याला विचारलें.

" हँ, त्यांत काय मोठंसं ! हें पोटावर पान आहे ना ते सारे नर, आणि ही वाटोळी उशीसारखी घडी आहे ती मादी, पण तूं चल आतां एक दोन बिळें उकरूं; "

" पण बिळांत कांहीं दुसरं तर नसेल ना ? "

" चल रे तूं ! "

आणि आम्हीं बिळें शोधित निघालों. थोड्याच अंतरावर किनाऱ्यापासून दोन फर्लांग अंतरावर दूर भुसभुशीत जागीं आम्हांला बिळें आढळलीं. नीट न्याहाळून भिवऱ्यानें एका बिळांत हातांतल्या काठीनें आंत ढोसून पाहिलें. अंदाज येईना, त्याहून दुसरी मोठी काठी शोधून आणून त्यानें पुन्हां अंदाज घेतला. आणि मोजून चार हात बीळ सोडून त्यानें पहारीनें खणायला सुरवात केली. मुंडा हातभर त्यानें खड्डा खणला, तिथें पाणी लागलें, त्या पाण्यांत खोलवर पसरट काठी घालून त्यानें पुन्हां मागोवा घेतला आणि तो ओरडला " सांपडलीं ! "

मीं हा सारा देखावा विस्मित होऊन पहात होतों तो खणलेला भाग तसाच सोडून आणखी दोन वितींच्या अंतरावर त्यानें खणायला सुरवात केली वीतभर खड्डा खणला असेल, भिवऱ्यानें मला हांक मारली.

" इकडे ये, ती काठी घे आणि बघ ढोसून आंत. "

मीं त्यानें सांगितलेल्या प्रमाणें काठी, खणलेल्या खड्यांत ढोसली. खटखट असा आवाज झाला आणि काठी आत घट्ट पकडली गेली.

" एक नाहीं दोन आहेत " भिवऱ्या ओरडला. आणि बाजूबाजूनें खणून वरच्या थराचें ढेंकूळ त्यानें पहारीनें दूर ढकललें. आणि काय आश्चर्य ! आपले भले मोठे डेंगे उभारून दाण दाण एकमेकांवर आदळून त्या दोन्ही चिंबोऱ्या आत्मरक्षणासाठीं भिवऱ्यावर हल्ला चढवायच्या पवित्र्यांत होत्या; पण आपली पहार भिवऱ्यानें दोघांच्याहि पाठीवर ठेवून आमच्या जवळच्या माडाच्या झावळीच्या दोरानें—चावूं पाहाणारें ते मजबूत डेंगे बांधून टाकले, आणि ती जड जोडी उचलून माझ्याजवळ दिली.

" नर आणि मादी ! या मादींत भरपूर लाख आहे. चार माणसांना पुरे ! "

मिळवलेली ती मिळकत घेऊन घरीं परततांना मी भिवऱ्याला विचारलें, " नक्की त्याच बिळांत चिंबोऱ्या आहेत हें तुला कसें कळलें रे भिवऱ्या ? "

" हँ, त्यांत काय ! अगदीं घर सारवून स्वच्छ केल्यासारखे चिंबोरीच्या बिळाचें दार असतें. घाण करतो तो नर ! "

" पण आंत दोन आहेत हें कसें कळलें तुला ? "

" तें देव शिकवतों आम्हांला. "

सहज भिवऱ्या सांगून गेला; परंतु कांटा आल्यासारखं शहारून तो म्हणाला, " आपल्याला ह्या बिळांतल्या चिंबोऱ्या घरीं नेतां यायच्या नाहींत. "

मी म्हटलें, " कां रे ? "

तसं तो म्हणाला " दोन चिंबोऱ्यांची देवचाराला मी आंगवण केली होती. गोणत्यांतल्या सगळ्या चिंबोऱ्या मोडलेल्या आहेत. धड आहेत त्या ह्या दोन."

" म्हणजे ह्याच दोन्हीं सोडायच्या ? "

" होय. नाहीं तर चिंबोरी पचायची नाहीं आपल्याला."

घाबरून आम्हीं मुकाट्यानें किनाऱ्यावर जातों. भिवऱ्या बांधलेल्या चिंबोऱ्यांचें दोर सोडतो आणि त्या भल्या मोठ्या दोन्ही चिंबोऱ्या खाडींत सोडून देतो.

गोणतें आणि सामान घेऊन आम्ही घरीं परततों.

" लाखेची चिंबोरी कशी ओळखायची रे ? "

" मादीच्या पोटांत लाख असते आणि लाखेची चिंबोरी जरा डौलदार, फुगरट आणि थोडीशी लालट असते. मात्र चांदण्यारात्रीच्या अशा चिंबोऱ्या भरलेल्या नसतात, पाणाळ आणि पोकळ असतात. काळोख्या रात्रींच्या सर्वच चिंबोऱ्या चांगल्या; अगदीं समुद्रांतल्या सुद्धां. "

" समुद्रांतल्या आणि खाडीच्या यांत फरक काय रे ? "

" खाडीच्या निराळ्या, व्हाळाच्या निराळ्या, बिळांतली तर जातच निराळी, आणि समुद्रांतल्या चिंबोऱ्या रंगीबेरंगी वस्त्र नेसलेल्या, परंतु बिळांतली किंवा व्हाळाची अस्सल जातीची चिंबोरी खाणारा समुद्रांतल्या जाळ्यांत गावलेल्या चिंबोरीला शिंवायचा देखील नाहीं. "

" कां ? "

" त्यांची चवच चवचवीत ! आणि जरा वारवल्या कीं समुद्रांतल्या चिम्बोऱ्या मेंग्या होतात किंवा मरून जातात. बिळांतली चिंबोरी कितीतरी दिवस जिवंत राहूं शकते."

" तुमच्याकडे चिंबोऱ्यांचें सांबारें मसाला घालून करतात काय रे ? "

" शी ! चिंबोऱ्यांत मसाला घालून त्याची चव तुम्हीं बामण बिघडवतां. चिंबोरी खायची ती भाजून. शिजवून शिजवून तिची मुळची खारी गोड चवच मरून जाते. फारतर नारळाची सोय, मिर्ची, हळद घालून मोजकेंच वांटप करून ती त्यांत शिजवली आणि शिजताना थोडासा चिरून कांदा टाकला, कीं त्याची रुची भाजलेल्या चिंबोरी सारखी

अनुक्रमणिका

नसली, तरी मुळांत कायम राहाते ! पण मसाला नकोरे बाबा ! तुम्हीं बामण फक्त मसाला खातां, चिंबोरी नव्हे ! आणि खाऊन खाऊन तुम्हीं किती खाणार ! तुम्हाला नाहीं पचायचें तें !" बोलतां बोलतां घर जवळ येतें·

" उद्यां गोंयदाच्या रापणीला येतोस ? दोन दिवस झाले रांपण घालून ! उद्यां दहा वाजेपर्यंत येईल किनाऱ्याला असा अंदाज आहे ! तूंयेच, गंमत पहायला मिळेल तुला !"

आणि दुसऱ्या दिवशीं यायचं वचन घेऊन भिंवऱ्या आपला वांटा घेऊन निघून गेला !

• • •

गोंयदाची रांपण आज तिसऱ्या दिवशीं १० वाजले तरी ओढून आली नव्हती. आम्हीं गेलों तेव्हां जवळ जवळ शंभर सव्वाशें माणसें ती ओढायला वावरत होती मैलाच्या अंतरावर चाळीस एक माणसें एका बाजूला ओढत होतीं आणि 'वेळेच्या' या दुसऱ्या बाजूला जवळ जवळ तितकींच माणसें रांपणीची दुसरी बाजू ओढत होतीं. मध्यें समुद्रांत होड्या टाकून तुटलेल्या जाळांला दोऱ्या बांधून कांहीं लोक तें सांधत होते. सारा समुद्र किनारा बगळ्यांच्या शिटण्यानें, कावळ्यांच्या कावकावीनें आणि माणसांच्या ओरडण्यानें गजबजून गेल्यासारखा वाटत होता. पर्वतप्राय लाटा घोंघावून येत होत्या आणि सुसाट आणि बेफाम वाहणाऱ्या वाऱ्यानें किनाऱ्यावरचे माड एकमेकांना घर्षण करीत होते. मधूनच पाण्यांतून एक मैला मोठा मासा उंच सूर मारी आणि पुन्हां रांपणीच्या आंतच पडे; जीव वांचविण्याची त्याची केंविलवाणी धडपड होती.

" कातयाळो शेंवटो " त्यां उंच उडलेल्या माशाकडे पाहून भिंवऱ्या ओरडला.

" तूं कसें ओळखलेंस ? "

" त्यांत काय शेंवट्याच्या उडीइतकी उंच उडी दुसऱ्या कुठल्याच माशाला मारतां येत नाहीं."

" पण कातयाळा म्हणजे काय रे ? "

" कातयाळा म्हणजे जाड कातडीचा आणि स्वादिष्ट, कातयाळ्या शेंवट्यासारखा दुसरा स्वादिक शेंवटा नाहीं."

आम्हीं बोलत असतांनाच हळूहळू रापण वर येत होती. खारव्यांची मुलें हातांत लहान लहान टोपल्या घेऊन ढोपरभर पाण्यांत राहून पळून जाणाऱ्या छोट्या छोट्या माशांना पकडून टोपलींत टाकत होती.

" आपण जाऊं ? "

" नको, 'वागोळें' कांटा मारील. त्याचा कांटा विखारी असतो. तो लागला, आणि काढतां आला नाहीं, तर जेवढें वागोळें समुद्रांत धांवेल तेवढा कांटा शरिरांत घुसून विखारतो. आणि..."

आतां रांपण वरती आली होती. भरून आली होती. गोंयदाचें वर्षाचें कल्याण ती करणार होती. जवळ जाऊन आम्ही रांपणीचा प्रत्येक भरलेला भाग पाहात होतो.

" बांगडा—" मी ओरडलों.

" नको घेऊं तो बेचव—रांपणीचा बांगडा तो–"

" मग दुसरा कुठला चांगला रे. "

" मागाचा, होडीचा हे दोन्ही चांगले. "

" मागाचा म्हणजे कसला रे ? "

मागाच्या जाळ्यांत अडकलेला बांगडा रक्त ओकत नाहीं, होडीचा पागलेला तात्काळ वरती घेतला जातो म्हणून रुचकर आणि रांपणीचा पाण्यांत ढवळून निवालेला–रक्त ओकलेला असा, त्याचा उपयोग खतालाच बरा. खायला तो चांगला नसतो. तसाच हा 'तारला,' होडींचा चांगला. तो भाजून खावा. आम्ही तार्ल्यांच्या

दिवसांत होडीवर गेलों, म्हणजे सकाळच्या पेजेबरोबर १००–१०० तालें खातों."

"भाजून कसे खायचे रे"

गवतांत भाजायचे आणि पुन्हा खाऱ्या पाण्यांत बुडवले कीं सटकन त्याची खवल्यांसकट सालटी आपोआप सुटते. आणि मग दांतांत धरून सरकन ओढला कीं, हातांतला कांटा तेवढा बाहेर फेंकायचा; रुचीक, रक्तवर्धक ! नाहींतर तुम्ही शिजवून खातां; पण मोसमाशिवाय आम्ही ह्या वस्तू गावल्या तरी खात नाहीं."

"ह्यांचा मोसम कोणता रे ?"

"बांगड्याचा नवरात्रांपासून पुढें चार महिने, तारल्यांचा माघापासून दोन महिनें, तिसऱ्यांचा मार्गशिर्षापासून सहा महिने, शेंवटे वर्षभर मिळतात, कोलबिही तशीच कर्ल्या, विस्वण हे सरत्या पावसाच्या मेघांच्या गडगडाटाबरोबर मिळतात."

"ही बघ कर्ली"

"शी ! मेलेली आहे तीं; मऊ आहे बघ. तीन दिवस रांपणींत कोंडून मेली ती."

"ती ताजी आहे हें कसं ओळखावचं रे ?"

कर्लीचं तोंड उघडलें कीं तिच्या गुलाबी गार तोंडांतली लाळ पचकन बाहेर येते आणि तिची मान हिरवीगार असते, ती कर्ली ताजी. ही कोलबी बघ, ही लाल वाईट, ही पांढरी चांगली आणि ही वाघी अत्युत्तम– ह्या मुडदुशा; पण या बारीक आहेत. पावसांत दुथडी भरून वाहणाऱ्या खाडीच्या गरवलेल्या मुडदुशा त्या मोठ्या आणि फार रुचकर असतात. मुडदुशांसारखा निर्मळ बाजार नाहीं, वेल्र्याही तशाच, निर्मळ आणि पाचक. कितीही खा. बाधायच्या नाहींत. पेडवे भाद्रपदांतल्या पंचमीपासून यायला सुरुवात होते. त्यांचा मोसम फार तर दोन महिने; पण पचायला जड बाजार ! हे सांगट अत्यंत गोड्स, तसेंच नरम, हीं खाडीचीं चिखलाचीं मिळालीं तर उत्तम."

"ही 'लेप' बघ, हिची सालटी काढल्याशिवाय ती खातां यायची नाहीं; एवढासा पातळ जीव हा, पण देवमाशाला मारतो;"

"तो कसा काय रे ?"

"देवमासा स्वतःभोंबतीं फिरून भोंवरा निर्माण करतो आणि खोलवर पाण्यांत जाऊन आ करून पाणी तोंडांत घेऊन कानांतून सोडून देतो. पाणी निघून जातें; पण शेंकडों मासे त्याच्या पोटांत जातात; पण ही लेप मोठी लुची. ती त्याच्या नाकावर जाऊन बसते आणि केवढीहि धडपड केली तर ती सुटत नाहीं. त्याचा श्वासोश्वास बंद होतो. आणि तो मेल्यानंतरच ती त्याच्यापासून सुटते."

"बापरे"

"तर, माशानां सुद्धां शेराला सव्वाशेर निर्माण करून ठेवलाय देवानें ! या कांटेऱ्या बघ केवढ्या मोठ्या, यांची वाढ एवढीच, जास्तींत जास्त हातभर; आंगभर कांटेच कांटे असलेला बाजार हा; पण खायला अति रुचकर ! तिरफळं घातलेली याची आमटी छान लागते.

"हो आमची आई करते ना तशीच !"

"ही 'मोरी,' फारच चांगली आहे ही"

"चांगली मोरी कशी ओळखायची रे ?"

"काळ्या पंखांची मोरी चांगली. तिचा थोडासा हरणासारखा दिसणारा लहानसा डोळाच सांगतो ती ताजी आहे का नाहीं तें. मोऱ्या फार मोठ्या असतात. अगदीं एक अख्खा माणूस गिळणाऱ्या; पण या छोट्याफार चांगल्या यांना खवलें नाहींत; पण निबर कातडीच्या. ती कातडी सोलून त्याच्या लहान लहान फोडी करून त्याचं शकशक करायचं ! वा ! किती छान लागतं नाहीं ? अगदीं सशाच्या मटणासारखं. साधारण मोठ्या मोरीच्या पोटांत देखील पन्नास पिलं सहज असतात. हा 'खुबा' बघ, हा चुकून कुठें वरती होता तो रांपणींत ओढून आला. नाहीं तर त्याची जागा हातभर खोल रेतींत."

"ए, 'खुबे' कसे काढतात. रे ?"

काळे लाळये 'खुबे' खाडींत चिखलांत सांपडतात आणि हे असले लाल आणि निर्मळ 'खुबे' रेतींतून काढावे लागतात. सुकती येऊन 'भाटी' पडली कीं विळा घेऊन त्या भाटीवर जायचं. आणि विळ्याच्या टोंकानें रेतिला टोंचून रेघा ओढल्या कीं पहिल्या दुसऱ्या रेघेलाच 'खुबा' आदळतो. बघ याचे शिंपले कसे लाल किरमिजी आणि मोठे आहेत ते. यांतली काळवं खायला गोड. लाळया खुब्यांची काळवं पचपचीत !"

मासळीच्या कंत्राटदारांचा सौदा गोंयदाशी पटला होता आणि विकायला नेणाऱ्या बायका टोपल्या भरभरून बाजाराकडे वळूं लागल्या होत्या.

"हें 'शेतुक' बघ ! खाडींत राहाणारं हे 'शेतुक' समुद्रांत कसं वळलं कोण जाणे."

मी त्या शेतकाकडे कितीतरी वेळ पहात होतों त्याच्या पाठीवरचे रुपेरी ठिपके कसे चिकटवल्यासारखे तकाकत होते. किती देखणा मासा होता तो !

"पण ही शेतकं खावीं खुटावणेचीं !"

"खुटावणी म्हणजे काय रे ?"

"अरे खाडीला जोर्गतीचं पाणी चढतं ना. अमावास्येच्या जोर्गतीचं पाणी तर तुमच्या गोठ्याच्या आढापर्यंत चढतं हें तुला माहित आहेच. पाणी पूर्ण भरून झालं कीं पागी लोक घाईनें मोठमोठे खूंट खाडीच्या किनाऱ्यापासून थोडे दूर पुरून त्याला इंचाच्या अंतरानें विणलेले जाळ बांधतात आणि पाणी सुकून गेलं, कीं भरतीबरोबर पाण्याचा फेस खात आलेली, झुडुपांत राहाणारी, रुचकर– स्वादिक मासळी जाळ्यांत अडकून पडते. त्यांत घोळशी, खर्चाण्या, शेतकं, वाघी कोलबी, आग्री बोय, काळुंदरं आणि पाळ अशी चांगली आणि कोळ्यांना पैसे मिळवून देणारी मासळी सांपडते.

इतक्यांत एका पखालींत चांगलीं जित्ती सुरमयची पोरं घेऊन गोंयदा माझ्याकडे येऊन तीं मला घेऊन जा म्हणाला होता.

"चहा घेतां ना ? तीन वाजतां जायचं आहे तुम्हांला."

"आं ऽ हो ! म्हणजे बराच वेळ डुलकी लागली म्हणायची मला !"

परंतु माझ्या स्वप्नदेशांत मीं काय पहात होतों हें तिला मीं सांगितलं नाहीं. त्याचा कांहीं उपयोग नव्हता. तिचं मन रमणार नव्हतं ! माझ्या आनंदांत कशाच रीतीनें ती सहभागी होऊं शकणार नव्हती ! • • •



खेळ म्हणून जनावरांची हत्या करणाऱ्या शिकाऱ्यालाहि हृदय असतं—भावनांचे कल्लोळ त्याच्याहि अंतःकरणांत उसळतात—आणि म्हणूनच सावज समोर असूनहि—मी ती संधि गमावली •



# घायाळ

—मधु मंगेश कर्णिक

चैत्रांतली दुपार. उकाड्यानें जीव उबगला होता. थंड पाण्याच्या घागरींवर घागरी अंगावर ओतून घ्याव्या, नाहीं तर नदीच्या डोहांत जाऊन डुंबत रहावें असें वाटत होतें. पण यापैकीं कांहीं न करतां मी अंगणांतल्या आंब्याच्या सावलींत आरामखुर्चीत पडलों होतों नि भीमा धनगराची आतुरतेनें वाट पहात होतों. भीमानें सकाळींच गांवच्या देवळामागच्या राईत भेकऱ्यांचा–एका विशिष्ट जातीच्या हरणांचा–माग काढला होता. नि आतां चारी बाजूंनीं राईची नाकेबंदी करून तो मला सांगावयास येणार होता. मी बंदूक भरून तयार ठेवली होती. सारा सरंजाम तयार होता. भीमा आला कीं मी बाहेर पडणार होतों. चेंडूगत टणाटण उडत पळणाऱ्या त्या अति चपळ गतीच्या हरणांवर निशाण धरून गोळ्या झाडायला मी अगदीं आतुरलों होतो. खूप दिवसांनीं पळत्या जनावरांची शिकार करण्याची संधि आली होती; नि माझे हात सळसळत होते.

अखेरीस भीमा आला. त्याचे सोबत धनगरवाड्यांतली आणखी तीन चार उमेदवार मुलें होतीं. लंगोट्या लावलेली. भर उन्हांतून ल्हा ल्हा करीत शिकारीच्या आशेनें आलेली. एका चलाख पोरानें तर उंच भाला पण बरोबर घेतला होता...

त्यांच्याबरोबर राईच्या दिशेनें चालतां चालतां मी विचारलें—
"भिम्या, लेका जनावरं आहेत ना खरींच ? का आपली हूलच आहे ?—"

"न्हाई धनी; अशी ह्या नदरेनं खुद्द म्यां बघितलीं—"

" किती नग होतील ?–"

" तीनाचा येक कळप ग्या राईत घुसलेला पाह्यला नि मागून दोन कुरूंद आले म्हणत होता शिवनाक महार–"

" बरं; मग बंदोबस्त कसा ठेवलायस ?—"

" समदी राई चारी बाजूंनीं कोंडून धरलीय...सकाळधरनं मानसं उभा राह्यल्यात् !–"

" पण माणसं नुस्तीं जमिनीवरच उभीं केलीं आहेस कीं–"

" तसं कसं जी ? मी काय शिकारींत नवा हाय् व्हय ? तुमच्या-संगच तर इत्ती वरसं काढलीं न्हवं ? राईजवळच्या समद्या उंच झाडांवर टेहेळे ठेवले हाईत. जनावर कुठं गेलं तरी उमगल्याविगर न्हींनार न्हाई–"

भीमा धनगर शिकारीच्या कामांत खरेंच मोठा तरबेज गडी होता. शिकार साधी ससाची असो किंवा पटाईत बिबल्या वाघाची असो; त्याची मला नेहमीच पक्की मदत होत असे. हांका उभारायला, टेहेळ्यांचे मोर्चे बांधायला नि जनावरांचा नेमका माग काढायला भीमा धनगर वेरकी इसम होता. त्याचे अंदाज अचूक असत नि पारधीच्या कामांत त्याचा उत्साहही उदंड असे......आजही असेंच झालें होतें. सकाळीं दहाच्या सुमारास त्यानें ही चुकार भेकरें गांवच्या राईत शिरतांना पाहिलीं नि लगोलग त्यानें राईभोंवती माणसांचा भक्कम पहारा बसवला, टेहेळे नेमके नि जनावरें राईत चांगलीं स्थिर झाल्यावर मला निरोप पाठवला.



" राईच्या कुठच्या अंगानें भेकरीं घुसलींत ?—"

" रामेश्वराच्या मागं खैराचं रान हाय् का...त्येच्या उजव्या अंगाला—"

" म्हणजे म्हाताऱ्या किंजळीवर टेहेळा ठेवला पाहिजे. तिथून पार डांबऱ्याच्या खरकलटापर्यंत माग मिळेल—"

" आपला संभा जगदाळे हाय् त्या झाडावर. झालंच तर रोंग्या धनगर माळावरच्या नांदरुखीवर हाय्... पावशा आंब्यावर नारायेन दळवी हाय्—"

" म्हणजे ताठ बंदोबस्त केलायस... आतां जनावरं हुसकून अंगावर आणा म्हणजे बघूं—"

" तुमच्या नेमबाजीवर आमचा इस्वास हाय् धनी; आवाज मोफत जानार न्हाई—"

" बघूं आतां—"

अर्ध्या मैलाचे अंतर रखरखीत उन्हांतून तुडवून आम्ही राईजवळ आलो. लांबदूरच्या साऱ्या उंच उंच झाडांवर टेहेळे तयार होते. एकमेकांना कुकारे घालीत टेहेळणी करीत होते. राईच्या चोहों-बाजूंनी माणसें लपून छपून उभी होतीं. चवदार मांसाची चार अश्राप हरणें मारण्यासाठीं सारे सज्ज झाले होते. मी बंदुकीनिशीं येऊन दाखल झालेला पाहतांच जवळच्या सात्विणावरील टेहेळ्यानें हरळी दिली—" ताल्या बामन नळी घेऊन आले हो ऽ ऽ—सावध, सावध ऱ्हावा समधांनी—"

भेकरीं ज्या एका विशिष्ट सरीवरून बाहेर पडण्याचा अधिक संभव होता, त्या सरीच्या तोंडाशीं, राईच्या बाहेर एका उक्षीच्या जाळींत मी अंग छपवून बसलों. नि भीमा धनगरास इशारत दिली. माझ्या इशारतीसरशीं रानकाढे ताबडतोब राईत घुसले नि ज्या ठिकाणीं जनावरें स्थिर झालीं होतीं त्या बाजूकडे राईच्या घनदाट झाडींतून टाळ्या वाजवीत चाल करून येऊं लागले.

मी बसलों होतो ती जागा गोळीबारास अतिशय अनुकूल होती. वरच्या किंवा खालच्या दोन्ही बाजूंनी मी सहज बंदूक चालवूं शकत होतों. जनावरें जर अपेक्षित ठिकाणाहून बाहेर पडतीं–तर मी लागोपाठ गोळ्या झाडून किमान एकाद दुसरें हरीण खात्रीनें जाय-बंदी करूं शकलों असतों. माझ्या निशाणबाजीवर माझा जबरदस्त विश्वास होता. नि भेकऱ्याची उडी कशी टिपावी हें शास्त्र मला चांगलें अवगत होतें.

मी सावधगिरीनें चाहूल घेऊं लागलों. समोरच्या गच राईतलें पांखरूंही माझ्या नजरेस पडत नव्हतें. पण आंतील रानकाढ्यांची हालचाल कानीं येत होती. हरणांच्या अशा शिकारींत तोंडानें शब्द काढायचा नसतो. केवळ टाळी वाजवून जाग द्यायची. मागून येणाऱ्या टाळीसरशीं हरीण विचकत विचकत पुढें सरकतें नि आयतें बरकंदाजाच्या तावडींत सांपडतें.

घटकाभर वेळ असाच गेला नि माझ्या वरच्या बाजूनें सात्विणाच्या झाडावरील टेहेळ्यानें हलक्या आवाजांत ओरडून सांगितलें– " जनावरें चाळवलीं आहेत नि आतां केव्हांही तीं बाहेर पडतील...सावध रहा–"

अनुक्रमणिका







नि मग एकाएकीं समोरच्या झाडींत खसखस झाली नि एका पाठोपाठ तीन भेकरें ताड् ताड् उड्या मारीत बाहेर पडलीं... वरच्या सारिवणावरील टेहेळ्यानें पुढच्या टेहेळ्यास हरळी दिली... त्यानें त्यापुढच्यास हाकाटलें, नि राईंतील रानकाढ्यांचा गलका एकाएकीं स्तब्ध झाला...दुपारच्या तळपत्या उन्हांत तीं तळपत्या अंगांची हरणें फुट्बॉलच्या वेगानें समोरून पळूं लागलीं. मी अतिशय चापल्यानें बंदूक जोखून त्यांच्या उड्यांचा वेध घेऊं लागलों—

सगळ्यांत पुढें पळणारा जो जवान आणि टळक नग होता तो, शिंगांना फांटे फुटलेला कुरंग (नर) होता. तो एव्हांना माझ्या बंदुकीच्या रेंजच्या पलीकडे गेला होता. पण मधलें हरीण मात्र मी नीट वेधूं शकलों. तें पळण्यांत किंचित् मंद होतें. त्याच्या तीन उड्या मी टार्जेट पॉइंटवर नीट जुस्तपणें पकडल्या नि चवथ्या उडीला, त्या हरणाचें मस्तक धरून मी चाप ओढला. पळत्या जनावराचें बंदुकीनें किरण टिपतांना साधारणपणें मस्तकाचा वेध घेतला म्हणजे धडाला गोळी लागते...माझा बार झाला नि तें हरीण किंचित् लचकलें...पळतां पळतां त्यानें मुरड मारली नि त्याचा वेग मंदावला. मी ओळखलें. माझें निशाण अचूक लागलें आहे. पांच-पन्नास यार्ड अंतर जिवाच्या आकांतानें काढून हें भेकर आतां खालीं कोसळलें...

माझें काडतूस फुटतांक्षणीं, राईंतलीं रानकाढीं माणसें भराभर बाहेर आलीं— झाडावरील टेहेळ्यांत एकमेकांना इशारती देण्याची गडबड सुरू झाली. भीमा धनगर उत्सुकतेनें माझ्याजवळ येऊन विचारूं लागला—"लागलाय् न्हवं बार?—"

"बहुतेक लागलाय्...पण मोठा नर निसटलाय्...मादी तेवढी निशाणांत सांपडली असें वाटतें—"

"हरकत न्हाई, चला म्हारं म्होरं—धावा, धांवा—लई लांब जाऊं देतां नये त्याला—" भीमानें बरोबरीच्या माणसांना सूचना दिल्या नि ते सारेजण त्या जखमी हरिणाच्या मागून धांवूं लागले. मीही बंदुकींत दुसरें काडतूस भरून त्यांच्या पाठोपाठ धांवूं लागलों.

एवढ्यांत एका टेहेळ्यानें ओरडून सांगितलें: तिन्ही जनावरें मध्यें न थांबतां डांबऱ्याच्या रानांत घुसलीं आहेत...जखमी झाल्यागत वाटणारें भेकरसुद्धां तिकडेच गेलें; मध्यें कोसळलें नाहीं. मार निसटता लागला असावा—

टेहेळ्याची ही खबर ऐकून मी चकित झालों. मी फार दुरून गोळी घातली हें खरें होतें......पण आवाज फुकट जाणार नाहीं याचीं खात्री होतांच मी चाप ओढला होता. माझ्या अंदाजाप्रमाणें जनावर जास्तींत जास्त म्हणजे एकादा फर्लांग जाऊन पडायलाच हवें होतें. पण हा टेहेळ्या ज्याअर्थी असें सांगतो, त्याअर्थी माझें कांहीं तरी चुकलें असावें. गोळी कारणीं न लागतां भलतीकडेच लागली असावी...न पेक्षां डांबऱ्याच्या रानाएवढें, म्हणजे सुमारें मैलभर अन्तर तें हरीण काटूं शकतेंच ना. खरें म्हणजे आतां मी धांवपळ करायला हवी. तें जखमी हरीण असेल तेथें त्याचा माग काढून पुन्हां गोळी घालायला हवी...मी घामानें थबथबलेल्या अवस्थेंत धांवूं लागलों—



*मस्त शारदीय रात!*

मस्तशारदीय रात!
पाय टाकिला तिने हळूंच लाज यौवनांत!

स्पर्शितांच सहज पाय
पारिजात हा फुले
विखुरलीं नभावरी
लक्ष तारका-फुलें!

सेवुनी सुगंध धुंद धावतो विमुक्त वात
मस्त शारदीय रात!

घेऊनी शिरावरी
चन्द्रमाठ चालली
झळकतांच दूध तें
चिंब तीच जाहली...

लाख नयन भोंवतीं बघून लाजली मनांत
मस्त शारदीय रात!

गगनधेनु ही दुधाळ
चंद्र-तींच वासरें
कास ये भरून...आणि
दूध खाळती गळे

वत्स होऊनी धरा स्तन्य तें पिऊन घेत
मस्त शारदीय रात!

—वसंत वऱ्हाडपांडे

सगळे रानकाढे पुन्हां डांबऱ्याच्या रानाभोंवतीं जमले. कशी फळी धरायची हें भीमा धनगरानें पुन्हां साऱ्यांना समजावून सांगितलें. जनावरें नेमकीं कुठेंशीं मुरलीं आहेत हें टेहेळ्यांकडून विचारून घेतलें, नि पुन्हां सारा खटाटोप सुरू झाला. माणसें रानांत घुसलीं. रान काढूं लागलीं. पण जनावरें बाहेर पडेनात. तें छोटेसें रान दोनदां भांगलून काढलें तरी जनावरांचा पत्ता लागेना. सारेजण निराश झाले. आयती हातातोंडाशीं आलेली शिकार हुकली म्हणून सारे हळहळूं लागले...आणि सर्वांत माझी अवस्था मोठी विलक्षण झाली. सकाळपासून हीं सारीं माणसें शिकारीच्या आशेनें धडपडत होतीं; तीं माझ्या नेमबाजीवर विश्वासून...आतां जर यांना मी जनावर मारून देऊं शकलों नाहीं तर खरेंच मोठी नामुष्की होती...

ते सारे असामी जवळच्या झरीवर पाणी प्यायला गेले, तशी मी भीमाला म्हटलें—"भीमा, आतां तूं नि मी दोघेचजण शिरूंया रानांत नि बघूं या कुठें माग लागतो का जनावरांचा...जखमी झालेलें हरीण कुठें तरी गारव्याला म्हणून पडतें नि तिथेंच हातपाय ताठ करतें—चल बघूं खटपट करून—"

भीमाला हा विचार पटला. आम्ही दोघेचजण हलकेंच समोरच्या रानांत शिरलों नि इकडची तिकडची बारकाईनें चाहूल घेत फिरूं लागलों...

रानांत बरेच दूरपर्यंत आम्हांला कांहीं माग लागेना. पण मध्येंच एके ठिकाणीं रक्ताचे ताजे थेंब एका झुडुपाच्या पानांना लागलेले भीमाच्या चलाख नजरेनें पाहिले नि त्यानें मला खूण केली. जखमी हरीण तिथून जातांना लागलेलें तें रक्त होतें, हें मी लागलीच ओळखलें. आणि मग त्याच मार्गानें आम्ही पुढें जाऊं लागलों. भीमा धनगर माग काढण्यांत खरोखरीच पटाईत इसम. त्याच्या बारीक नजरेनें, रक्त जसजसें सांडत गेले होतें तसतसा बिनचूक माग काढला नि आम्ही थोड्याच वेळांत एका दाट झाडीच्या, वेलीझुडुपांनीं गच भरलेल्या ठिकाणीं येऊन पोंचलों. भीमानें माझ्या हाताला धरून ओढलें. तो हात लांब करून मला कांहींतरी दाखवीत होता...मी पाहिलें; तो काय आश्चर्य ? तिन्ही भेकरें मानेंत मान घालून एका जाळींत निवांत उभीं होतीं. त्यांचें लक्ष आजूबाजूला कुठेंही नव्हतें. आडोशाला राहून पण अतिशय जवळून आम्हीं त्यांना पाहात होतों...पण त्यांना त्याची चाहूलही नव्हती—

त्या मादीच्या पुठ्ठयाला गोळी लागली होती. तेथल्या मांसल भागांतून रक्त भळभळत होतें; नि तिचा तो उमदा प्रियकर आपल्या जिभेनें तिची जखम चाटीत होता. सुमारें दीडफूट उंचीच्या त्याच्या ऐटबाज शिंगांना एकच डौलदार फांटा फुटला होता, नि त्या पुष्ट आणि कांतिमान कुरंगाला तो कोंवळा शिंगाडा शोभिवंत दिसत होता. मोठमोठ्या पाणीदार डोळ्यांनीं आपल्या जोडीदारणीच्या दुःखाकडे बघत तो केविलवाणेंपणानें तिची जखम चाटीत होता. नि त्याची ती लहानसर बांध्याची मादी स्वतःच्या काळ्याभोर डोळ्यांतून घळघळां आंसवें गाळीत होती. समोर खालीं मान घालून उभ्या असलेल्या पाडसाला वरचेवर हुंगा मारीत होती नि पुन्हां पुन्हां त्या कुरंगाच्या मस्तकाला आपलें गोजिरवाणें मस्तक भिडवीत होती. त्याला हुंगीत होती. ...तिचें निरीक्षण करतांच माझ्या लक्षांत आलें कीं ही मादी गाभण आहे...तिचें पोट टुढुंबलें होतें. कास फुगलेली दिसत होती. तिच्या लवचिक शरीराला गर्भपूर्ण उदराचें ओझें पेलवत नव्हतेसें वाटत होतें; नि त्यामुळें आणि पाठीला झालेल्या जखमेनें ती निरपराध हरिणी कासावीस झाली होती.

गरीब जातीच्या भेकऱ्यांच्या त्या दुःखी कुटुंबाला तशा विकल अवस्थेंत पाहून मी विरघळलों...एकाएकीं मला माझ्या बाळंतपणासाठीं माहेरीं गेलेल्या पत्नीची तीव्रतेनें आठवण झाली. तिचे दिवस भरत आले होते; नि तिच्याकडच्या पत्राची मी गेले चार दिवस उत्कंठेनें वाट बघत होतों...मला गहिंवरून आलें. उभ्या शिकारी आयुष्यांत असें करुण दृश्य मी पाहिलें नव्हतें...भावनांचा असा कल्लोळ मी कधीं अनुभवला नव्हता.

पण भीम्या धनगर हें कांहीं ओळखत नव्हता. त्याला घाई झाली होती. तो कानांत कुजबुजला—"बघताय् काय...पेटवा लवकर—"

"भिम्या, मादी गाभण आहे...मी बंदूक उचलणार नाहीं—"

"पायां पडतों तुमच्या; असा खुळेपणा करूं नका...पेटवा लवकर..." भिम्या पुन्हां कुजबुजला, "न्हाईतर माझ्याकडे द्या ती बंदूक—" असें म्हणत भिम्यानें माझ्या हातांतील बंदुकीला हात घातला—

"नाहीं, भीम्या—तें शक्य नाहीं !" मी केवढ्यानें तरी ओरडलों. नि त्यासरशीं त्या तिन्ही हरिणांनीं कान उभारून, भयचकित होऊन माझ्याकडे पाहिलें...त्यांची आमची दृष्टिभेट होतांच, वाट फुटेल त्या तीन दिशांनीं ती तिघेंजणें उडालीं...बघतां बघतां नाहींशी झाली...

भीम्या धनगरानें आणि दरोबस्त साऱ्या शिकारी मंडळींनीं, सोन्यासारखी शिकार हातची गमावली म्हणून मला खुळें ठरवलें; पण माझ्या एका खुळ्या प्रश्नाचें उत्तर मात्र अद्याप कोणीच देऊं शकलेला नाहीं. त्या गर्भवती हरिणीचें पुढें काय झालें असेल ?—

• • •



"आतां तूं निघणार कीं नाहीं—अगदीं अखेरचं विचारतेंय—नाहींतर मी आपला जातो."

इश्श, एवढं काय झालं तापायला. तासभर सांगतेय कीं, एका मिनिटांत माझी तयारी आटपतें म्हणून—आणि अजून विश्वास नाहीं ?

अनुक्रमणिका

भारतीय कलामहर्षि



# अवनींद्रनाथ टागोर

—नटराज

" When I consider who is the person most deserving of honour in Bengal, the first name which suggests itself to me is that of Abanindranath. He has saved the country from the sin of self deprecation. He has raised her from the depths of humiliation and has regained for her the honoured position which was hers by right... A new era has dawned upon India through a reawakening of her art consciousness. And it is from him that the whole of India has learnt her lesson anew. "

— **Rabindranath Tagore.**

१८९७ सालची गोष्ट. ख्यातनाम चित्रकार आणि चित्रकलासमीक्षक डॉ. इ. बी. हॅवेल हे कलकत्ता स्कूल ऑफ आर्टचे प्रमुख म्हणून काम करीत होते. एक दिवस विद्यालयाच्या उपप्रमुखांनीं डॉ. हॅवेल यांची एका तरुण बंगाली चित्रकाराशीं ओळख करून दिली. चित्रकाराची भावदर्शी मुद्रा आणि त्याच्या कुंचल्याची करामत पाहून डॉ. हॅवेलनीं त्याला आपल्या आर्टस्कूलमध्यें उपप्रमुखाची जागा देऊं केली. डॉ. हॅवेलसारख्या अत्यंत चोखंदळ मार्मिक आणि रसिक टीकाकाराचें आमंत्रण म्हणजे त्या तरुण चित्रकाराचा गौरवच होता. 'माझी चित्रकलेंतील प्रगति आणि करामत विद्यालयाच्या कारभाराला कितपत उपयोगी पडेल आणि त्या कामाच्या ओझ्याखालीं माझी कलाप्रतिभा ओसरणार तर नाहीं ना–' या शंकेनें व्याकुळ होऊन त्या बंगाली तरुणानें सुरवातीला आढेवेढे घेतले. 'पण तूं घाबरूं नकोस, माझें सर्वतोपरी मार्गदर्शन तुला मिळेल.' असें आश्वासन देऊन डॉ. हॅवेलनीं त्याला ती जागा स्वीकारण्यास भाग पाडलें.

हा तरुण चित्रकार म्हणजे भारतीय चित्रकलामहर्षि श्री अवनींद्रनाथ टागोर. अवनींद्रनाथांच्या या नेमणूकीनें त्याकाळीं चित्रकला विश्वांत मोठीच खळबळ उडाली. 'आयडियल्स ऑफ इंडियन आर्ट' हा ग्रंथ लिहून हॅवेलनीं

भारतीय चित्रकलेबाबत एक विलक्षण औत्सुक्य देशीं आणि परदेशीं निर्माण केलें होते. भारतीय शिल्पकलेवरील त्यांच्या दुसऱ्या पुस्तकानें 'भारतीय शिल्पकलेबाबतच्या अनेक पारंपारीक संकेतांना हादरा दिला होता. त्या काळांत अजंठा ही केवळ स्मृतीच राहिली होती. आपण भ्रष्ट पाश्चिमात्य चित्रकलेचें व्यर्थ अनुकरण करीत आहोंत--तसें पाहिलें तर आपल्यापाशीं फार मोठा वैभवशाली साठा आहे. ही जाणीव त्यांनींच प्रथमतः भारतीय कलाकारांना करून दिली. शिल्पकलेचे जागोजाग उभे असलेले उध्वस्त नमुने केवळ पुराण अवशेष म्हणून दुर्लक्षिले जात होते. भारताची थोर परंपरा विसरून तरुण चित्रकार पाश्चिमात्य वळणावर आपली चित्रें रंगवीत बसले होते. भारतीय कलेची परंपरा आतां नष्ट पावणार कीं काय अशी भीति निर्माण झाली होती. या परंपरेची खरी माहिती भारतीयांना पटवून देण्याचें थोर कार्य हॅवेलनी केलें. आधुनिक शिल्पशास्त्रांच्या ठोकताळ्यावर अवलंबून न राहातां भारतीय शिल्पकलेची आंतरिक महति दिग्दर्शित करण्याचें कार्य हॅवेलनीं केलें. हें कार्य पुढें चालविण्यासाठीं डॉ. हॅवेलना एखादा कर्तबगार शिष्य हवा होता. अवनींद्रनाथांच्या रूपानें हा शिष्य अचानक त्यांच्यापुढें उभा राहिला.

१८७१ सालीं जन्माष्टमीच्या दिवशीं अवनींद्रनाथांचा जन्म झाला. टागोर घराणें म्हणजे विश्वविख्यात. लक्ष्मीच्या जोडीला सर्व ललितकला टागोर घराण्यांत पाणी भरीत होत्या. अवनींद्रनाथांचे वडील गिरींद्रनाथ ह्यानीं कलकत्त्याच्या बोनझार आर्ट स्कूलमध्यें शिक्षण घेतलें होते. अवनींद्रनाथांचे वडिल बंधु गगनेंद्रनाथ हे तर उत्तम चित्रकार म्हणून ख्यातनाम होते. पण अवनींद्रनाथांच्या आईची इच्छा अशी कीं आपल्या 'अबन' नें चित्रकार न होतां मोठा पंडित व्हावं आणि विद्वान म्हणून कीर्ति मिळवावी. पण छोट्या अबनचं लक्ष पुस्तकापेक्षां चित्रें काढण्यांतच अधिक रमत होतें.

ते नऊ वर्षांचे असतांना त्यांच्या घरांतली सर्व मंडळी गंगा नदीच्या किनाऱ्यावर चंपादाणी या नयनरम्य खेड्यांतील एका टुमदार घरांत राहायला आली. या घराभोंवतीं एक छानदार बाग होती. या बागेंतून आजूबाजूला नजर टाकली कीं अस्सल बंगाली खेड्याचें दर्शन होई. गंगेवरून डोईवर कळशी घेतलेल्या बंगाली युवती घरीं परताहेत, वृक्षांच्या सान्निध्यांत पांखरांचे कूजन चालू आहे, परड्यांतील फुलझाडांवर चित्रविचित्र फुलपांखरें भिरभिरताहेत, तलावांतील चमकदार मासोळ्या—अशीं शेंकडों दृश्यें 'अबन' नें आपल्या स्मृतींत सांठवलीं. सुंदर सुंदर रेखाचित्रें त्याच्या हातून वहीवर उमटूं लागलीं. एक दिवस ही रेखाचित्रांची वही त्यांचे काका नीलकमल यांच्या हातीं पडली. छोट्या अबनचें हें कर्तृत्व पाहून त्यांना कौतुक वाटलें त्यांनीं त्याला शाबासकी दिली आणि कांहीं सुंदर चित्रें आणि रंगीत पेन्सिली बक्षीस दिल्या.

१८९० पर्यंत अवनींद्रनाथांनीं संस्कृत आणि इंग्रजीचा अभ्यास केला. त्यावेळचे त्यांचे सहाध्यायी अनुकूल चतर्जी यांच्यापासून चित्रकलेचे कांहीं धडे त्यांनीं गिरविले. १८९२ सालीं कलकत्त्याला 'साधना' नांवाचें एक फार चांगलें मासिक प्रसिद्ध होत असे. या मासिकांतून नियमितपणें अवनींद्रनाथांची चित्रें प्रसिद्ध होऊं लागली. रवीन्द्रनाथांच्या 'चित्रांगदा' नाटकाला साजेशीं अशीं चित्रें त्यांनीं काढून दिली. या काळांत त्यांनी संगीताचाहि अभ्यास सुरूं केला, शिवाय कांहीं सुंदर कथा आणि नाटकेंहि त्यांनी याच वेळीं लिहिली.

१८९७ सालीं म्हणजे वयाच्या पंचविसाव्या वर्षीं त्यानीं त्यावेळचे कलकत्ता गव्हन्मेंट स्कूल ऑफ आर्टचे व्हाईस प्रिन्सिपॉल सिनार गिलार्डी यांच्या हाताखालीं चित्रकलेचे धडे गिरविले. त्यानंतर चार्लस पामर यांच्या हाताखालीं सुमारें पांच वर्षे त्यानीं शिक्षण घेतलें, या कालखंडांत त्यांनी तैलरंगांत अनेक चित्रें रंगविली. मात्र त्यांचें कलम संपूर्णतया पाश्चात्य वळणाचें होतं.

१९०० सालीं अवनींद्रनाथ मोंघीर येथें गेले. तेथील भारतीय शिल्पांचे उध्वस्त नमूने पाहून त्यांच्या संवेदनाक्षम अंतःकरणावर खोल परिणाम झाला 'कष्टहारिणी' आणि 'विश्राम' घाटावर बसून भारतीय जीवनाचें त्यांना फार निकट दर्शन झालें. प्राचीन भारतीय शिल्पाचें हे नमूने आणि भारतीय ग्रामजीवनाचें नवें दर्शन यामुळें त्यांच्या कुंचल्यानें एक नवीनच वळण पत्करलें. एक दिवस त्यांच्या घरांतील जुन्या पुस्तक संग्रहांतील एका सचित्र पर्शियन हस्तलिखित पाहून त्यांच्या अन्तःकरणांत विलक्षण कालवाकालव माजली. त्या पुस्तकांतील अनुपम चित्रमालेनें ते मोहित झाले. आपल्या कुंचल्यांत आपलें सर्वस्व ओतण्याची त्यांची तयारी झाली. त्यांच्या प्रतिभेनें भारतीय आकांक्षांच्या अनुरोधानें झेंप घ्यायला सुरवात केली. वयाच्या तिसाव्या वर्षीं भारतीय चित्रकलेंतील एक नवें पर्व अवनींद्रनाथांनीं सुरूं केलें. मोंघीर येथें पैदा केलेली नवी कलात्मक दृष्टि वापरून त्यांनीं 'कृष्णलीला' ही कृष्णाच्या चरित्रांतील प्रसंगावरील चित्रावलि चित्रित केली. अवनींद्रनाथांच्या कुंचल्यानें पाश्चात्य वळणाचा कायमचा त्याग केला आणि विलोभनीय भारतीय वळण स्वीकारलें.

यानंतर सात वर्षांनीं त्यांची आणि डॉ. हॅवेलची भेट झाली. डॉ. हॅवेल म्हणजे भारतीय चित्रकलेचे महान् द्रष्टे. या दोन कलावंतांची भेट म्हणजे अवनींद्रनाथांच्या आणि भारतीय चित्रकलेच्या इतिहासांतील एक क्रांतिकारक क्षण. अवनींद्रनाथ त्या काळांत आपल्या लाडक्या कन्येच्या कायमच्या ताटातुटीमुळें अगदीं विकल बनले होते. त्यांना दिलासा हवा होता. हॅवेलनीं त्यांना सहानुभूति दिली, प्रेम दिलें. अपरंपार माया केली. कन्यावियोगाच्या दुःखाला चित्रकला हेंच औषध आहे हें त्यांनीं अवनींद्रनाथांना पटवून दिलें. योगायोगानें जवळ आलेले हे थोर कलावंत पुढें नामवंत गुरुशिष्य म्हणून ख्यातीला पोंचले. शांतिनिकेतनमध्यें आपल्या विद्यार्थ्यांच्या समोर बोलतांना, केव्हां केव्हां आपल्या थोर गुरूच्या आठवणीनें ते गहिंवरून यायचे. त्यांच्या डोळ्यांत अश्रु तरळत. ते म्हणत–हॅवेलनीं माझ्यावर अपार ममता केली. आईप्रमाणें माझें पालनपोषण केलें. मला उचलून कडेवर घेतलें, मला आधार दिला. केव्हां केव्हां ते मला थट्टेनें सहकारी तर केव्हां मला शिष्य म्हणत. खरंच त्यांनीं आपल्या धाकट्या भावापेक्षांहि अधिक प्रेम माझ्यावर केलें. तुम्हांला ठाऊक आहेच कीं नंदलालवर माझं किती प्रेम आहे. पण गुरुंनीं माझ्यावर त्याहिपेक्षां जास्त प्रेम केलें.

हॅवेलनीं त्यांना आर्टस्कूलच्या उपप्रमुखाच्या जागीं नेमलें. आर्टस्कूलच्या आवारांत उपप्रमुख म्हणून पाऊल टाकतांच हॅवेलनीं त्यांना

अनुक्रमणिका

विद्यालयाच्या चित्रशाळेंत नेलें. या चित्रशाळेची त्यांनीं पूर्वींच साफसफाई केली होती. युरोपमधील ख्यातनाम चित्रकारांच्या तिसऱ्या दर्जाच्या चित्रकृति काढून टाकून त्याजागीं मोंगल चित्रकलेचे कांहीं अस्सल नमुने त्यांनीं त्या ठिकाणीं ठेवले होते. हा चित्रसंग्रह पाहून अवनींद्रनाथ आश्चर्य चकित झाले. "भारताच्या मध्ययुगीन चित्रकलेंत एवढं रत्नभांडार असेल याची मला कल्पना नव्हती. या चित्रकलेंत भावनेचा अंश नव्हता–तो भावनेचा अंश ओतण्याचा मी निश्चय केला...

प्राचीन भारतीय चित्रकलेचे ते सर्वांगसुंदर नमुने पाहून अवनींद्रनाथांना आपण कुठें उभे आहोंत तें उमगलें. भारतीय कुंचल्यांत जिवंत भावना ओतली तर ती क्रांति करील असें त्यांचें मन त्यांना ग्वाही देऊं लागलें. थोर कलावंताचे हे आत्मचिंतन म्हणजे भारतीय कलेच्या वैभवाची पदचिन्हें. या चिंतनांतून एक थोर जागतिक कीर्तिची कलाकृति निर्माण झाली. शहाजहान तुरुंगांत शेवटची घटका मोजीत शय्येवर पडला आहे. त्याची प्रेमळ कन्या दुःखाने जमिनीवर स्तब्ध बसली आहे. मृत्युशय्येवर शेवटची घटका मोजणाऱ्या त्या सम्राटाची नजर मात्र खिडकींतून दूरवर दिसणाऱ्या ताजमहालकडे लागली आहे. या प्रसंगावर अवनींद्रनाथांनीं मोंगल वळणावर एक भावदर्शी चित्र काढलें. एक थोर अविस्मरणीय कलाकृति म्हणू रसिकांनीं आणि चित्रसमीक्षकांनीं तिचा देशांत आणि परदेशांतहि गौरव केला. दिल्ली दरबार प्रसंगीं हें चित्र मांडलें गेलें. पुढें काँग्रेसच्या प्रदर्शनांतहि तें मांडलें गेले. सर्वांनीं त्याची एकमुखानें वाखाणणी केली.



अहो खोटं नाहीं—नाटकगृहांत कोणी डॉक्टर आहेत का ?

भारतीय चित्रकलेचा नवा संप्रदाय सर्वत्र वाखाणला जातो आहे असें पाहून अवनींद्रनाथांच्या प्रतिभेला बहर आला. त्यांच्या कलेचे नवे उन्मेष रसिकाना सादर झाले. त्यांनीं, 'वेताळपंचविशी' चित्रित केली. 'बुद्धजन्म' हे नामांकित चित्र काढलें 'बुद्ध-सुजाता बहादुरशहा, उमरखय्यामच्या रुबायावरील चित्रमाला विशेषतः १९०६ सालीं उमरखय्यामच्या रुबायावरील त्यांची चित्रें म्हणजे अवनींद्रनाथांच्या प्रतिभेचा परमोत्कर्ष. त्यांची कीर्ति युरोप खंडांतहि पोंचली. सत्य घटना अशी कीं, रविन्द्रनाथांच्या अगोदर कितीतरी वर्षें अवनींद्रनाथ युरोपांत नामवंत झाले होते. डॉ. हॅवेल नॉर्मन ब्लंट, पॉन्टेनमॉलरसारख्या अवनीन्द्रनाथांच्या युरोपियन मित्रांच्याच आग्रहामुळेंच गीतांजलीचें इंग्रजींत भाषांतर झालें.

अवनीन्द्रनाथांच्या कलेला असा बहर येत असतांना अनेक तरुण चित्रकार त्यांच्याभोंवती जमा होत होते. नंदलाल बोस हे त्यांतील शिष्योत्तम. आपल्या गुरुच्या पुढें जाऊन त्यांनीं भारतीय चित्रकलेची प्रतिष्ठा वाढवली. आसितकुमार हलधर या थोर चित्रकारानेंहि या बाबतींत नंदलालशींहि स्पर्धा केली. त्यांची शिक्षण देण्याची हातोटीच कांहीं न्यारी होती. ते म्हणत, "विद्यार्थ्यांच्यावर कांहीहि लादावयाचें नाहीं—ठोकळेबाज धडेहि द्यायचे नाहींत. फक्त आत्माविष्काराच्या मार्गांतील अडथळे तेवढे दूर करायचे." आपल्या शिष्यांच्या कलाजीवनांतहि त्यांनी कधीं ढवळाढवळ केली नाहीं. नंदलाल बोस हे त्यांचे लाडके शिष्य 'उमेची तपश्चर्या' हें त्यांचे गाजलेलें चित्र. हें चित्र तयार होत असतांना अवनींद्रनाथांना त्यांत कांहीं फेरफार करण्याचा मोह झाला. पण घरीं परत आल्यावर ते अस्वस्थ झाले—रात्रभर ते झोंपले नाहींत पहांटे ते तडक आपल्या शिष्याच्या स्टुडियोंत गेले आणि एक थोर कलाकृति तशीच अबाधित राखली. आपली चूक त्यांना वेळींच उमगली. नंदलालच्या कलाविश्वांत मी कोण ढवळाढवळ करणार ? त्यांच्या अंतःचक्षूंच्या समोर निर्माण झालेली तपस्वी उमेची मूर्ति आणि तिला साजेशीच त्याची रंगयोजना होती—आणि मी मात्र वेड्यासारखा तें चित्र बिघडवून टाकणार होतों."

त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांना प्राचीन चित्रकला, शिल्पकला आणि शिल्पकलेचे सर्वत्र विखुरलेले नमुनें अभ्यासिण्यास उत्तेजन दिलें. रविवर्म्यांच्या प्रभावामुळें आमच्या देवता पाश्चात्य वळणावर चित्रित केल्या जात होत्या. अवनींद्रनाथांनी आपल्या विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठीं एक संस्कृत पंडित ठेवला. तो त्यांना रामायण महाभारतांतील कथा सांगे. आपल्या जुन्या वाङ्मयांत देव-देवतांचें कुठें चित्रण सांपडतें कां याचे संशोधन सुरू झालें. या विषयावर आपल्या विद्यार्थ्यांकडून त्यांनीं चित्रें काढून घेतलीं व ती लोकप्रिय झाली. सर्वांचें लक्ष या नव्या कलमाकडे वळले. आणि सर्वत्र या नव्या संप्रदायाबद्दल कुतूहल निर्माण झालें. नव्या भूमिका घेण्याबाबत त्यांनीं आपल्या शिष्यांना केव्हांहि प्रतिबंध केला नाहीं. कारण त्यांनीं स्वतःच पाश्चात्य वळणाचा त्याग करून संपूर्णतया भारतीय वळणाचा अंगिकार केला होता. एक पाश्चिमात्य चित्रसमीक्षकानें तर असें म्हटलें,

"He wanted nothing to interfere with or retard the healthy modern tendency towards breaking free from all fetters whether European or ancient indian."

आपल्या विद्यार्थ्यांच्या समोर बोलतांना ते नेहमीं म्हणायचे, "प्रतिभेचा आविष्कार करतांना अपयशामागून अपयश यायचं. केव्हां केव्हां त्यामुळें मी खचून जायचा. प्रत्येक सृजनशील कलाकाराला असा अनुभव नेहमीच येत असेल. फक्त कृष्णलीला चित्रित करतांना परिपूर्तीचा अननुभूत आनंद मिळाला. मी आणि माझ्या चित्रविषयांत पूर्णतया तादात्म्य होतं. माझ्या अंतचक्षूसमोर भगवान

अनुक्रमणिका

दर दहा मैलांवर भाषा बदलते असा भाषाशास्त्रांतील सर्वमान्य सिद्धांत आहे. महाराष्ट्र प्रदेश या सिद्धांताला अपवाद नाहीं. भिन्न भिन्न ठिकाणीं मराठी भाषा वेगळ्याच रूपांत आढळते. पण बाह्यांग थोडेसें बदललें तरी अंतरंग कसें बदलणार ! त्यामुळें गोमंतकापासून तों नागपूरपर्यंतच्या प्रदेशांतील मराठी भाषेचे हे नमूने म्हणजे मराठी भाषेनें धारण केलेले नवे प्रादेशिक अलंकार—

## भाषा मराठीच

वऱ्हाडी भाषा—

### खीर आन साखऱ्या

एक गांव होतं. तिथिसा एक घर होतं. घरात्नी दोघं नौरा-बायको ऱ्हात होते. नौऱ्याचं नांव होतं साखऱ्या आन बायकोचं खीर. त्याईच्या घरीं एक डुंगभर[1] वावर होतं. वावराची वाहीपेर्नी[2] करासाटीं दोन बैल होते. एका बैलाचं नांव होतं पावना आन दुसऱ्याचं टेंगा.[3]

एकडाव् काय झालं का साखऱ्या, पावना आन ठेंगा घ्यूनशान् वावरांत गेला. उलंगयाडीचे दिस असल्याच्यानं वावरांत्नी वखर धरला होता. साखऱ्याचं वावर पान्नीले[4] भिडून होतं. त्याच्याच्यानं पान्नींतून गांवाकड येतां जातां मानूस साखऱ्याले वखरता वखरता दिसत होता. आन् चालनेवाल्यालेई वावरांतला साखऱ्या वयखूं येत होता. थ्या रोजीं पान्नींतून गांवाकड चाल्लेल्या एका पावन्यानं साखऱ्याले वखरतावक्ति पायलं. थो कूपं वलांडून वावरांत गेला. दोघाईची वयख पटल्यावर पानखांड झालं. मंगसिना पावन्यानं साखऱ्याले गांवाकडे जासाटीं कितीक वखत आये-थे बोलतां बोलतां ईचारून पायल्यावर साखऱ्या तरखला ? साखऱ्यानंहि ईचार केला आतां जरासक वखून व्हाचं रायलं त थे होईठावरक काई पावन्याले उनींत बसवून ठिवनं चांवलं नाई. त्याले द्याव् घराकड धाडून. उपासीतापासी, थकूनभागून आला असन विचारात घरीं गेल्यावर भाकरतुकडा खाईन आन आफून घरीं जायेठावरक अराममराम तरी करन. इचार केल्यावर साखऱ्यानं चंची गुंडतावक्ति पावन्याले मन्लं, "पावने, बुवा– तुमी जाआनं घरीं...खीर आयेच..."

पावना मोठ्या खुशीनं गांवाकडे जाआले निघाला.

पावन्याले आंग्नांत पाऊन खीरीनं पायमाय धुवासाठीं पानीन्-तन् देलं. मंग वस्रींत तढो आथरून बसाले लावलं. तढवावर पावना जाऊन बसला. कारभारीन कईकई ताट वाहाडते आन कईकई जेवाले बलावते याची मनांतल्या मनांत वाट पाऊं लावला.

पन असा घंटा गेला. दोन घंटे गेले तरी खीरीनं पावन्याले ताट काई वाहाडलं नाई आन जेवाले काई बलावलं नाई. तवा पावन्यानं आपलं पाहुनपन सोडलं आनं रान्नीन्तल्या कारभानीकड तोंड करून मन्लं, " खीरत असन्ना घरांत ? "

" हौ. पन साखऱ्या नाई. "

आयकून पावन्याले भलकसं नवल वाटलं. साखऱ्यासिवा खीर कसी झाली असाव् मून थो अिचार करूं लागला.

असा संजचा पाहार झाला.

येतांसांजीं[6] आपल्या मोहोरच्या ठेंगा आन पावन्याले खेदत[7] खेदत साखऱ्या घरीं आला. त्याच्या डोक्स्यावर तुऱ्हाट्याचा भारा होता. थो ठेवासाठीं साखऱ्या कोठ्यांत गेला. तितल्यांत ठेंगा त्याच्या मांगमागं चालत कोठ्यांत गेला आन पावना साडसूड वस्रींत धसला. हें पायल्याबरोब्बर डोक्स्यावरचा भारा जिमिनीवर टाकून साखऱ्या मोठ्यानं आपल्या बोयकोले बोलला, " अओ, तूं वस्रींतल्या " पावन्या " ले धरून ठिव्...मी कोठ्यांतून " ठेंगा " आन्तो..."

हें वस्रींतल्या तढवावरच्या पावन्यानं एक डाव् आईकलं, दोन्डाव् आईकलं आन तिस्त्रून आपला सोटादुपट्टा गुंडायून ' भो ! ' केली. आपल्या गांवच्या रस्त्यानं लागला. चालतां चालतां मांगं फिरून पात् जाये आन आपल्या मनांतल्या मनांत मनत् जाये, " ची मायभैन, भलकसे लोक लुच्चे असतत बा ! वेस झालं आफून आपला सोटादुपट्टा गुंडायला त...नाई त आज केवढ्याची आल्ती !..."

— उद्धव ज. शेळके

१ छोटेखानी. २ लावलागवड. ३ मोठी काठी. ४ पांधण. ५ कुंपण. ६ दिवे लागणीची वेळा. ७ हाकलत.

कृष्णाच्या चरित्रपट सरकायचा आणि भराभर कुंचल्यांतून चित्रें रेखाटलीं जात."

अवनींद्रनाथांच्या या महत्तम कार्याला त्यांचे बंधु श्री. गगनेंद्रनाथ यांचें साहाय्य होतें. अवनीन्द्रनाथांच्या कलासेवेला गगनेंद्र-नाथांचा सक्रीय पाठिंबा होता. त्याचें प्रतीक म्हणजे त्यांनी स्थापन केलेली ' इंडियन सोसा-यटी ऑफ ओरिएंटल आर्ट '.

आणि त्यामुळें अवनीन्द्रनाथांच्या प्रतिभेला अनिर्बंध संचार करता आला. अभिसारिका (१८९२) शहाजहानचा मृत्यु (१९००) बुद्ध आणि सुजाता (१९०१) कृष्णलीला (१९०१–३) या चित्रांनी त्यांना कीर्ति मिळ-वून दिली. ' अलमगीर ' या त्यांच्या चित्राची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. वृद्धत्वामुळें किंचित वांकलेला हा मोगल सम्राट, त्यानें दोन्ही हात पाठीमागें नेले आहेत—आणि हातांत एक पुस्तक आहे. या पुस्तकांत खुणे-साठीं खंजिर ठेवला आहे. मोंगल सम्राटाच्या हाताची बोटं म्हणजे कोणतीहि दयामाया न ठेवतां आपल्या भक्ष्यांवर झडप घालणाऱ्या गरुडाच्या नखांसारखीं. १९२८ सालीं अरबी भाषेंतील सुरसकथा चित्रित केल्या.

वयाच्या ७९ व्या वर्षी हा थोर कलावंत दिवंगत झाला. त्या अगोदर आठ वर्षं म्हणजे १९४२ सालीं विश्वभारतीनें खास अवनीन्द्रनाथ अंक काढून त्यांचा यथोचित गौरव केला. आज त्यांचे सच्छिष्य श्री. नंदलाल बोस त्यांची गादी चालवीत असून भारतीय कलेचें श्रेष्ठत्व वाढवीत आहेत.




अनुक्रमणिका







# परमेश्वर आणि मी

- बाल गंधर्व
- लता मंगेशकर
- श्री० माधवराव बागल
- श्री० शम्र

हजारों वर्षें मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचे दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें. या उत्तरपत्रिकांतील निवडक अशा कांहीं पत्रिका दरमहिन्यास आम्हीं वाचकांना सादर करणार आहोंत.

## — आमची प्रश्नपत्रिका —

**१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का? असेल तर कां? नसेल तर कां नाहीं?**

**२—आपला धर्मावर विश्वास आहे का? असेल वा नसेल! तर काय म्हणून?**

**३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय?**

**४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय?**

**५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधीं आणखी कांहीं सांगू शकाल का?**

## बाल गंधर्व

बालगंधर्वांनीं मराठी रंगभूमीवर दोन तपांहून अधिक काळ आपल्या अपूर्व गायनाभिनयाच्या जोरावर एखाद्या राजराजेश्वराप्रमाणें घालवला. त्यांच्यासारखा लोकोत्तर कलावंत शतकांतून एकदांच निर्माण होतो. आज ते रंगभूमीवरून निवृत्त झाले आहेत आणि त्यांच्याबरोबर मराठी रंगभूमीचें वैभवहि निवृत्त झालें!

उ. १—परमेश्वराला मी अवश्य मानतों. त्याची सत्ता न मानणें म्हणजे एकप्रकारचा वेडेपणाच आहे. पण त्यापेक्षां माणसांतच ईश्वरीअंश आहे असं माझं मत आहे. हा ईश्वरी अंश अत्यंत प्रभावीपणें मला माझे गुरु कै. भास्करबुवा बखले, आणि गुरुवर्य पै. महेबूबखाँ यांच्यांत आढळला. त्यांच्या मागोमाग माझी आई आणि कै. काकासाहेब खाडिलकर यानांहि मी परमेश्वरासमान मानलें. या चारहि व्यक्तींची मी अनन्यसाधारण भक्ति केली आणि तिचें शुभफल मला नेहमीच मिळालें.

उ. २—धर्मावर माझा विश्वास आहेच. पण सर्व धर्मांतील तत्त्वें एकच आहेत असें माझें मत आहे. माझी पत्नी मुसलमान-धर्मीय असून आम्ही दोघांनीं स्वतःचा धर्म सोडलेला नाहीं. आणि त्यांत कधींच संघर्ष निर्माण झाला नाहीं. श्रीकृष्ण, महंमद आणि येशू हे एकच आहेत असें माझें मत आहे.

गायन हीच माझी देवपूजा. आतां वय झाल्यानुळें हें गायनाचें रोजचें आह्निक आतां अनियमित झालें आहे. तुकारामाचें अभंग कबीराचे दोहे म्हणजे माझा म्हातारपणचा विसावा आहे. साईबाबांवर माझी विशेष श्रद्धा आहे. त्यांचे नित्य स्मरण करण्यांत मला धन्यता वाटते.

उ. ४—ईश्वराचे अस्तित्व आहे हें सिद्ध करणारे अकल्पित प्रसंग आयुष्यांत अनेक आले. १९१६ च्या सुमारास एल्फिन्स्टन थिएटरला आमचीं नाटकें लागत. या थिएटरजवळ एक पीराचे जागृत स्थान होतें. नाटक सुरू होण्यापूर्वी या पीराला उद घातल्याशिवाय मी कधींच पडदा उघडला नाहीं. आणि आतांपर्यंत एकदाहि एलफिन्स्टन थिएटरवरचें माझें नाटक पडलें नाहीं.

३ वर्षांपूर्वी गोहरबाईचें एक कठिण ऑपरेशन डॉ. बालिगा यांनीं केलें. त्या दिवशीं मी अत्यंत अस्वस्थ झालों पण मला साईबाबांनीं जणूं प्रत्यक्ष कानांत सांगितलें—काळजी करूं नको—

आणि ऑपरेशन यशस्वी झालें.

• • •

## लता मंगेशकर

जगप्रसिद्ध लोकप्रिय गोमंतकीय गायिका. लताबाईंसंबंधीं विशेष अधिक परिचय काय लिहावा !

उ. १—आहे. तुमच्या दुसऱ्या प्रश्नाचें (परमेश्वर नसेल तर कां नाहीं ? ह्या प्रश्नाचें) समाधानकारक उत्तर देणारें कोणी मला अद्याप भेटलें नाहीं, हें झालें एक कारण. आणि तितकेंच महत्त्वाचें म्हणजे मला कळूं लागलें, तेव्हांपासून " परमेश्वर आहे " या गोष्टीवर मी, " आई आहे, वडील आहेत, घर आहे, आभाळ आहे किंवा अगदीं मी आहे." या गोष्टींइतका विश्वास ठेवीत आलें आहे. तो आहे कशावरून ? या प्रश्नाचा विचारहि मला कधीं करावासा वाटलेला नाहीं; इतकी या गोष्टीची सत्यता मी गृहीत मानलेली आहे. हें बव्हंशी बालपणांतल्या कौटुंबिक संस्कारांवर व वातावरणावर अवलंबून असतें. आमच्या घरांतल्या व्यक्तीला परमेश्वर आहे काय, आणि तो कां आहे ? हा प्रश्न उभ्या हयातींत कधीं कुणाला पडत नाहीं. कमालीच्या प्रतिकूल परिस्थितींतून आणि त्याहिपेक्षां आत्यंतिक निराशेतून, अश्रद्धपणाचा आणि असल्या प्रश्नांचा जन्म होतो. मला तसा अनुभव सुदैवानें नाहीं. प्रतिकूल परिस्थितींतहि मला अश्रद्ध होण्याइतकी निराशा कधींच वाटली नाहीं. आणि समजा वाटली असती तरी मी अश्रद्ध झालें नसतें. आतां एका फार वरच्या बौद्धिक पातळीवरून कोणाला परमेश्वर या श्रद्धेमागची सत्यासत्यता स्वतंत्रपणें भासण्याजोगी आहे. परंतु त्या तुलनेनें मी फार फार सामान्य स्त्री आहे. मी श्रद्धेवर जगतें.



उ. २—आहे. हाही बव्हंशी बालपणच्या संस्कारांचाच प्रश्न. धार्मिक वातावरणांत मी लहानाची मोठी झालें. त्यांत भोंवतालच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक घडामोडींकडे पहातांना त्यांना एक धार्मिक अर्थ आहे असें मला अलीकडे स्पष्टपणें आढळून येऊं लागलें आहे. त्यामुळें धर्म ही केवळ एक भाकड कल्पना नव्हे अशी खात्री होऊं लागली आहे. दैनंदीन जीवनांतून परमेश्वरापर्यंत पोंचण्याचा सामान्य माणसाचा मार्ग जन्मजात धर्माच्या चाकोरींतूनच जाऊं शकतो. आपला धर्म आपल्याला आपल्या नैसर्गिक कलानें माणूस म्हणून जगायला शिकवतो आणि म्हणून तो जपला पाहिजे असें मला वाटतें.

उ. ३—होय. श्री शंकराची पूजा नित्यनेमानें न चुकतां करतें. ज्ञानेश्वरी वाचतें. परंतु त्याहिपेक्षां सूरब्रह्मांतून मी देवाच्या जास्त आणि जास्त सहजपणें निकट पोंचूं शकतें. असा माझा अनुभव. योगांतल्या "समाधीचाच" तो एक वेगळा प्रकार असूं शकेल. निदान अशा संगीत-समाधींत मला लाभतो तो आनन्द, जाणवतें तें चैतन्य या लोकींचें सर्वसामान्य वाटत नाहीं.

उ. ४—हो प्रत्येकालाच तसे लहानमोठे अनुभव येत असावेत. परंतु योगायोग, अपघात असें म्हणून किंवा त्यांचें श्रेय बळेंच एखाद्या निमित्तमात्र माणसाच्या गळ्यांत बांधून लोक मोकळे होतांना दिसतात. मला तसें जमत नाहीं. आयुष्यांतल्या प्रत्येक अनपेक्षित क्षणीं माणसाआधीं मला परमेश्वर सुचतो हाही संस्कारांचाच प्रश्न.

उ. ५—क्वचित्, परमेश्वर मुळांत अस्तित्वांतच नसला तर काय, असा विचार मी गंमतीखातर करून पहातें. मग या जगांतल्या एकूणएक व्यवहारांचा एक उरफाटा अर्थ जाणवूं लागतो. तो म्हणजे, माणसाच्या वेडसर लहरींवर चालणारा एक फार मोठा आणि अत्यंत धोक्याचा जुगार असें जगाचें जीवनाचें स्वरूप दिसूं लागतें. शाश्वतीची भावना पळ काढते आणि पायाखालची भुईच सरकावी तसें कांहींतरी होतें, मन गुदमरतें; मला वाटतें परमेश्वर हा माणसाचा फार मोठा आधार आहे. सुखाच्या वेळीं तो उदार दाता असतो, दुःखाच्या वेळीं विश्वसनीय धन्वंतरी असतो, विपत्तींत एकनिष्ठ शेजारी असतो, आणि वेदनेंत त्यांचे कार्य एखाद्या श्रेष्ठ " पेन-किलर " सारखें असतें. परमेश्वरी अस्तित्वाच्या एका आधारावर तर कचकड्याच्या देहाचा माणुस सुरक्षितता झुगारून अति मानवी धाडसें करतो. थोडक्यांत परमेश्वर हा या मानवी जीवनाचा आत्मा होय.

— शिवम् भवतु — ••

## श्री. माधवराव बागल

माधवराव बागल म्हणजे संस्थानी राजकारणांतील एक लढाऊ व्यक्तिमत्व. पण राजकीय जीवनाच्या धकाधकींत या कलावंताचें कलाप्रेम कधींच लोपलें नाहीं. आज त्याच निष्ठेनें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळींतहि आघाडीवर—

उ. १—परमेश्वर म्हणून एक चांगलें वाईट करणारी शक्ति आहे, या रुढ कल्पनेवर माझा विश्वास नाहीं. तसा मला अनुभव आलेला नाहीं. शक्ति आहे पण ती तुमचे चांगले वाईट करण्याचा उद्योग करीत नाही. तुम्ही तिचा उपयोग करून घेऊं शकता.



उ. २–धर्म–म्हणजे संस्कार विधी–वगैरे असा मानल्यास त्या धर्मावर माझा विश्वास नाहीं. पण मानवी जीवन सुखाचं व शांतीच व्हावं म्हणून जे कांहीं विचार धर्मग्रंथांतून मांडलेले असतात ते मला विचारार्ह वाटतात.

उ. ३—प्रतिदिनीं पूजा करीत नाहीं. पण मनःशान्तीसाठीं मन एकाग्र करणं फायदेशीर असतं असं मला वाटतं.

वरींच धार्मिक पुस्तकें विशेषतः गीता अनेक वेळां वाचली आहे. पण नियमित पठन करीत नाहीं.

उ. ४—स्पष्टीकरण तर्कशुद्धदृष्ट्या करतां येणार नाहीं असे कांहीं प्रसंग आयुष्यांत घडले आहेत. पण त्यांना दैवी अगर अतिमानवी असे मानण्याची मला आवश्यकता वाटत नाहीं. ती गोष्ट मला समजूं शकत नाहीं एवढेच मी म्हणेन.

उ. ५—परमेश्वरावरच माझा विश्वास नसल्यामुळें मानव व परमेश्वर यांच्या संबंधाबद्दल मी कांहीं लिहूं शकत नाहीं.

• • •

## श्री. शेख

मुंबई सरकारच्या प्रकाशन विभागांतील ९० रुपये पगारावरील एक ऑपरेटर. आपलें काम वरें कीं आपण वरें ही वृत्ति. पगारांत वाढ होण्याची फारशी आशा नसतांहि आनंदी आणि हंसतमुख.

---

उ. १—परमेश्वरावर माझा जरूर विश्वास आहे. कारण आपलें जें बरेंवाईट घडतें तें त्याच्या मर्जीमुळें अगर गैरमर्जीमुळें घडतें अशी माझी खात्री आहे.



उ. २—धर्मावर माझा जरूर विश्वास आहे. उलट आम्हां मुसलमानांना धर्म प्राणापेक्षां प्यार आहे. या धर्मासाठीं आम्ही वाटेल तें करूं एवढी आमची त्यावर श्रद्धा आहे.

उ. ३—रोज संध्याकाळीं नमाज पढणारे भाविक मुसलमान पन्नास टक्क्याहून अधिक असतील असा माझा अंदाज आहे; पण मला नोकरीमुळें संध्याकाळ कधींच मोकळीक मिळत नाहीं. तथापि मी शुक्रवारीं नमाज पढल्याशिवाय बिलकुल राहात नाहीं. मोहरमचा उपास, ईद या सणावारी आम्ही उपासतापास जरूर करतों.

उ. ४—तसा अनुभव अजून मला आला नाहीं. पण आमच्या मोहल्यांत आजारीपणांत डॉक्टर-हकीमकडे जायच्या अगोदर अल्लाची प्रार्थना करतात. ही प्रार्थना एखादी साथ असल्यास आम्ही सांघिकपणें करतों आणि त्यामुळें आम्हांला अनेक वेळां दिलासा मिळाला आहे असा आमचा प्रत्यक्ष अनुभव आहे.

• • •





अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य संमेलन म्हणजे मराठी साहित्यिकांची वार्षिक पंढरीची यात्राच. १९३० सालीं कै. प्रा. वामन मल्हार जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मडगांव साहित्यसंमेलनाच्या निमित्तानें 'यशवंत' मासिकानें मे महिन्यांत खास साहित्यसंमेलन अंक काढला होता. मराठींतील नियतकालिकांच्या कांहीं उत्कृष्ट खास अंकांपैकीं हा एक खास अंक होता. या अंकांत श्री. वा. ग. मुर्डेश्वर यांनीं महाराष्ट्र साहित्य संमेलन आणि त्यापासून होणारें वाङ्मयीन कार्य याचा निःपक्षपाती आढावा घेतला आहे तो आजहि वाचकांना उद्बोधक वाटेल.




# महाराष्ट्र साहित्य संमेलनें

: १ :

गेलीं पन्नास वर्षें साहित्य संमेलनाची कल्पना महाराष्ट्रापुढें कमीअधिक मूर्तस्वरूपांत वावरत आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. आपल्या देशांत ग्रंथ फार थोडे आहेत. वाचनाभिरुचीही फार कमी प्रमाणांत आढळून येते; "त्यामुळें विद्येचा लाभ फार थोड्या मनुष्यांस होतो." ही स्थिती सुधारण्याचा विचार करण्यासाठीं मराठी साहित्य सेवकांची पहिली सभा इ. स. १८७८ सालीं पुण्यास भरली. त्यावर्षी जानेवारी महिन्यांत प्रथम रा. ब. रानडे व रा. गोपाळराव देशमुख यांनीं "या देशांत ग्रंथकारांस उत्तेजन यावें व स्वस्त दरानें ग्रंथ प्रसिद्ध व्हावा" या हेतूनें मराठी ग्रंथोत्तेजक मंडळीची योजना वृत्तपत्रांतून लोकांच्या पुढें मांडली. त्यावर कोणी एकानें इंदुप्रकाशांत पत्र लिहून "कुशंका" काढल्यावर रानडे-देशमुखांनीं पुन्हां वृत्तपत्रद्वारें आपल्या कल्पना विशद करून सांगितल्या. वर्गणीदारांनीं पांच रुपये प्रत्येकीं भरून मंडळीनीं प्रसिद्ध केलेल्या पैकीं पसंत पडतील तीं पुस्तकें ध्यायचीं, अशी योजना होती. व ५०० वर्गणीदार जमतांच मंडळीच्या कामास सुरवात करण्याचा बेत होता. इतिहास शास्त्रें, पदार्थ व नियमवर्णन, सुधारणा, चरित्रें, धर्म, उपयुक्त कथा व संस्कृत ग्रंथांतील विषय इत्यादिकांवर ग्रंथ लिहवून प्रसिद्ध करणें हा मंडळीचा उद्देश होता. १५ फेब्रुवारी १८७८ च्या खुलासेवजा जाहीरपत्रकांत रानडे-देशमूख म्हणतात, "जीं पत्रें आम्हांस येतील त्यांवरून व आमच्या माहितीवरून कोणते ग्रंथाची उणीव व जरुरी आहे, तसेंच जे ग्रंथ मागावयाचे ते एकाच ग्रंथकारास सांगून मागवावे किंवा जास्त लोकांकडून तयार करवावे वगैरे सर्व गोष्टींचा विचार करण्याकरतां येत्या मे महिन्यांत मराठी ग्रंथकारांचें तसेंच मासिक पुस्तककर्ते यांचे एक कान्फरन्स (सभा) पुणें येथें भरविण्याचा बेत आहे. त्यावेळीं सर्व विचार ठरविण्यांत येतील. "ठरल्याप्रमाणें ही सभा पुण्यास ११ मे १८७८ रोजीं पार पडली. आज उपलब्ध असलेल्या साधनांवरून या सभेची सायंत हकिगत कळत नाहीं; पण फार थोडे ग्रंथकार जातीनें हजर होते. त्यांची बरदास्त नीट ठेवली गेली नाहीं असें दिसतें. वर उद्धृत केलेल्या उताऱ्यांत सभेचें कार्य व उद्देश यांचा निर्देश झालेला आहे; व त्या वरून सभेंत झालेलीं भाषणें व पास झालेले ठराव मराठी ग्रंथोत्तेजक मंडळीच्या आवश्यकतेबद्दल असतील, असा तर्क करण्यास जागा आहे. केवळ एका संस्थेस जन्म देण्यास भरविलेल्या—मग ती केवळ वाङ्मय कार्यास वाहिलेली कां असेना, सभेस "साहित्य संमेलन" म्हणतां येईल कीं नाहीं हा प्रश्न आज वादग्रस्त आहे. पण तत्कालीन कांहीं वृत्तपत्रांनीं या सभेस साहित्य-संमेलनाचा मान देवून असे समारंभ निरर्थक व निरुपयोगी आहेत अशी टीका केली होती. सभा भरण्यापूर्वी ज्या कित्येक टीकाकारांनीं विलायतेकडील कांहीं ग्रंथवृद्धिकारक संस्थांचीं उदाहरणें सांगून या संस्थेमुळें कांहीं फायदा होणार नाहीं, "चार दिवस तिच्या अस्तित्वाची टिमकी वाजेल व तिचें मग कोणास स्मरण देखील रहाणार नाहीं." अशी शंका काढली होती, त्यांस सभेचा समारोप करतांना माधवराव रानड्यांनीं विलायतेकडील व आपली परिस्थिति यांतील अन्तर दाखवून, त्यांचें आपण अनुकरण करणें कसें अशक्य आहे हें गळीं उतरविलें; व या संस्थेच्या उपयुक्ततेबद्दल शंका बाळगणाऱ्या टीकाकारांना "संस्था गेली तरी तिचा उपयोग आहे." असें उत्तर दिलें.

: २ :

१८७८ सालीं अस्पष्टपणें व्यक्त झालेली, कांहींच्या मतें अव्यक्त राहिलेली—साहित्य संमेलनाची कल्पना आणखी सात वर्षांनीं पूर्णत्वानें व्यक्त झालेली दिसते. त्यावर्षी रानडे उन्हाळ्याच्या सुटींत पुण्यास आले असतां, त्यांनीं आणखी कांहीं स्थानिक पुढाऱ्यांच्या सल्ल्यानें मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत ग्रंथकारांच्या संमेलनाविषयींचे एक विनंतिपत्रक प्रसिद्ध केलें. रानड्यां-

शिवाय त्यावर नीलकंठ जनार्दन किर्तने, महादेव मोरेश्वर कुंटे, गोपाळ गणेश आगरकर, इत्यादिकांच्या सह्या होत्या. ग्रंथकारांची " परस्पर एकमेकांची ओळख व्हावी, भाषेची स्थिती ग्रंथांच्यासंबंधानें कशी आहे व ती कोणत्या उपायानें सुधारतां येईल, याविषयीं चर्चा व्हावी, व नवीन ग्रंथ करण्याच्या कामीं ज्या अडचणी येतात त्या दूर व्हाव्या. " हे या संमेलनाचे उद्देश होते. संमेलन एका दिवसांत आटोपलें; ग्रंथकार थोडे आले होते व समारंभ फारसा उत्साहजनक झाला नाहीं. " त्या ( संमेलनाच्या ) दिवशीं गेल्या वीस वर्षांत मराठी भाषेंत जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत त्यांचा साधारण इतिहास देऊन, त्यांतील गुणदोष थोडक्यांत सांगून, कोणत्या विषयांवर ग्रंथांची न्यूनता आहे व ती दूर कशी होईल याविषयीं निबंध वाचला जाईल, असें विनंति पत्रक जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें स्वतः रानड्यानींच निबंध लिहून वाचला अशी हकिकत अलिकडे प्रसिद्ध झालेली आहे तिला आधार कांहीं प्रस्तुत लेखकास तरी सांपडला नाहीं. ग्रंथकारांच्या अडचणी दूर करण्याच्या विचारासाठीं जमलेल्या संमेलनांत दक्षिणा-प्राईज कमिटीच्या कामाबद्दलही चर्चा व्हावी हें स्वाभाविकच होय, या चर्चेचें फळ म्हणजेच पुढें नऊ वर्षांनीं निघालेली डेक्कन व्हर्नाक्यूलर ट्रान्स्लेशन सोसायटी असेंहि प्रतिपादण्यांत येतें.

: ३ :

" पुढें दरवर्षी हा ( संमेलनाचा ) क्रम चालू ठेवण्याची " हमी १८८५ चें विनंति पत्र देत असलें तरी पुढें २१ वर्षेंपर्यंत दुसरें मराठी ग्रंथकारांचें संमेलन भरविण्याचा योग आला नाहीं. साहित्य संमेलनाची कल्पना महाराष्ट्राकडून इतर प्रांतांनीं घेतली व देशी भाषांचीं साहित्य-संमेलनें भरविण्याचा उद्योग सुरू झाला; पण महाराष्ट्रास लागलेली झोंप उघडली नाहीं. शेवटीं १९०५ सालीं रा. ब. पारसनीस यांच्या परिश्रमांनी दुसरे मराठी साहित्य संमेलन साताऱ्यास रा. रघुनाथ पांडुरंग करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें. या संमेलनांत सर्व निमंत्रित ग्रंथकारांची वसण्या-उठण्याची सोय एकाच ठिकाणीं केलेली असून त्यांना एकमेकांची ओळख करून घेण्यास, विचार करण्यास उत्तम सवड दिली होती. पण त्या दृष्टीनें हें संमेलन संस्मरणीय झालें एवढेंच ( पुढील संमेलनावर झालेल्या टीकांवरून ) कळतें. पुढील वर्षीं मे महिन्यांत संमेलन पुण्यांस रा. गोविंदराव कानिटकर यांच्यां अध्यक्षतेखालीं भरलें होतें. त्या वेळीं ज्यांना ग्रंथकार म्हणतां येईल असे फारच थोडे लोक हजर होते. " मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेचा प्रवेश करविणें, ऐतिहासिक व वाङ्मयात्मक लेखांचा संग्रह करणें, इतिहास संशोधनास व्यवस्थित स्वरूप देणें, शिलालेखांचें वाचन करणें, आधुनिक कवींचा परामर्ष घेणें, मराठी भाषेचा कोश, विश्वकोश यांसारखे प्रचंड ग्रंथ निर्माण करणें इत्यादि उत्तम प्रतीच्या विषयांची चर्चा पुण्यास भरलेल्या या दुसऱ्या व एकंदरीनें तिसऱ्या संमेलनांत प्रथम झाली. याचवेळीं साहित्य परिषद नांवाची कायमची संस्थाही स्थापण्यांत आली. " राजवाड्यांचा शिलालेखावरील लेख सोडल्यास नांव घेण्यासारखा निबंध संमेलनांत वाचला गेला नाहीं. कांहीं परिक्षांच्या अभ्यासक्रमांत स्थल दिल्याबद्दल युनिव्हर्सिटीचें अभिनंदन करण्याबद्दल एक ठराव मांडला गेला होता. पण त्याला प्रो. विजापूरकर, राजवाडे वगैरेंनीं करून विरोध केल्यावरून त्याचा विचार ' तहकूब ' करावा लागला. भाषेच्या वाढींत राजाश्रयाचा पाठिंबा पाहिजे व ग्रंथावर टीका करतांना व्यक्तिशः ग्रंथकारांवर टीका करूं नये, ह्याविषयीं थोडी चर्चा झाली.

: ४ :

या संमेलनांत स्थापन झालेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे पुढील संमेलन पुण्यास मळेकऱ्यांच्या वाड्यांत १८–१९ मे १९०७ रोजीं भरविण्यांत आलें. मराठी भाषाभिमान्यांनीं एकत्र जमून " त्या भाषेच्या उन्नत्यर्थ काय करणें शक्य आहे व इष्ट आहे याचा विचार करावा व त्या दिशेनें ज्यांचे प्रयत्न चालले आहेत त्यांच्या एकत्र गांठी पडून परिचय व्हावा. " हें संमेलनाचें उद्देश होते. पुष्कळ लोकांच्या सूचनेवरून चर्चेसाठीं विषय ठरवून वर्तमानपत्रांतून त्यांस प्रसिद्धी देण्यांत आलेली होती. संमेलनाध्यक्ष रा. ब. वि. मो. महाजनी यांनीं मराठी भाषा बोलणारे लोक संख्येनें २ कोटी भरत असले तरी सर्वत्र पांगलेले आहेत, त्यांच्यांत साक्षरता व वाङ्मय-प्रेम फार कमी प्रमाणांत आहे व गुजराथप्रमाणें महाराष्ट्र श्रीमंत नाहीं इत्यादि मराठी वाङ्मयाच्या उन्नतिआड येणाऱ्या अडचणींचा उल्लेख करुन या पांगलेल्या मराठे लोकांस एकत्रित करणें हें सर्वांच्या ग्रंथकारांचें मोठें कर्तव्य आहे, असें आपल्या भाषणांत प्रतिपादन केलें. देशांत चाललेल्या पाश्चिमात्य व पौर्वात्य सुधारणांच्या झगड्याचा आपण जपानचें अनुकरण करुन निकाल लावला पाहिजे, असें त्यांनीं सांगितलें. या संमेलनांत रा. भि. जोशी यांचा, व्याकरणाचे कांहीं प्रयोगावर, वि. कों. ओक यांचा भाषाशैलीवर, राजवाडे यांचा दहाव्या शतकांतील मराठी गद्यरचनेवर, रा. ब. वैद्य यांचा " मराठी वाङ्मयाची भावी उन्नतावस्था ", पारसनिसांचा " अहिल्याबाई होळकरीण " व लक्ष्मणशास्त्री लेले यांचा " कवि व कविता " इत्यादि निबंध वाचले गेले. शास्त्रीय विषयांची परिभाषिक **शब्दांची** जंत्री तयार करणें, मराठी क्रमिक पुस्तकांचा विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमणें, लेखकांसंबंधीं माहिती मिळवून देणें, नवीन पुस्तकांवर अनुकूल अभिप्राय देणें, राजवाड्यांच्या ऐतिहासिक कागदपत्रांचा एक भाग प्रसिद्ध करण्यासाठीं मदत करणें इत्यादि ठराव पास झाले.

त्यांना अनुसरून चिटणीसांनीं १९०७ मध्यें विनंतिपत्र काढून ग्रंथकारांनीं परिक्षणासाठीं ग्रंथ पाठवून द्यावे, पारिभाषिक शब्दकोश जे



अनुक्रमणिका

व्यक्तिशः तयार करीत असतील त्यांनीं चिटणिसांशीं पत्रव्यवहार करावा व प्रत्येक ग्रंथकारानें स्वतःच्या चरित्रांतील ठळक गोष्टींचें व ग्रंथांचे टांचण परिषदेकडे पाठवावें अशा अर्थाची विनंति केली. पण पुढील वर्षी संमेलनांस सादर् केलेल्या रिपोर्टावरून तिचा विशेष उपयोग झालेला दिसून येत नाहीं. परिक्षणासाठीं फक्त चार पुस्तकें आलीं व राजवाड्यांचा ऐतिहासिक कागदपत्रांचा खंड छापण्यासाठीं मदत म्हणून अवघे साठ रुपये जमा झाले. त्यापैकीं कांहीं कारकुनीसाठीं खर्च झाले ! शास्त्रीय परिभाषेविषयीं मात्र परिषदेनें या वर्षांत स्पृहणीय कामगिरी बजावली. अर्थशास्त्र, रसायनशास्त्र, गणित, ज्योतिष, तत्त्वज्ञान आणि भूगोल या निरनिराळ्या विषयांची परिभाषा तयार करण्याचें काम अनुक्रमें रा. ब. महाजनी. प्रो. लक्ष्मणराव साठे, प्रो. पेंडसे, रा. कृ. वा. दिक्षित, प्रो. गोडबोले व प्रो. गोखले यांजकडे सोंपवून एका वर्षाच्या आंत तें तडीस नेलेंहि. ग्रंथकारांच्या प्रकाशनासंबंधीच्या अडचणी दूर व्हाव्या, व लोकानांहि ग्रंथ स्वस्त मिळावेत या हेतूनें संमेलनापुढें समाईक भांडवलाच्या कंपनीची योजना ठेविली गेली होती; पण संमेलनामार्फत अशी कंपनी निघाल्याचें ऐकिवांत नाहीं.

: ५ :

पांचवें मराठी साहित्य संमेलन पुण्यास विजयानंद थिएटरांत ३०–३१ मे १९०८ या दिवशीं रा. ब. चिंतामणराव वैद्य यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. अध्यक्षांचें विद्वत्तापूर्ण भाषण झाल्यावर संमेलनाचे सेक्रेटरी रा. कृ. प्र. खाडिलकर यानीं, परिषदेनें त्यावर्षी केलेल्या कामाचा अहवाल वाचला. वर उल्लेखिलेल्या पारिभाषिक शब्दांच्या याद्या तपासून सुधारण्यासाठीं संमेलनांत निरनिराळ्या कमिट्या नेमण्यांत आल्या. त्यानंतर रा. लक्ष्मणशास्त्री लेले यांचा "मराठी क्रमिक पुस्तकांवरील निबंध" वाचल्यावर रा. रानडे व रा. प्रो. ओतूरकर यानीं त्यावर चर्चा केली. गं. पा. सहस्त्रबुद्धे यांच्या 'मराठी शास्त्रीय वाङ्मय,' व. रा. गोगटे यांचा "मोडी लिपी," राजवाडे यांचे निरनिराळ्या विषयांवर निबंध वाचले जाऊन त्यांवरहि चर्चा झाली. ठराव कांहीं पास करण्यांत आले नाहींत; केवळ विद्यानंदांतच वेळ घालविण्याचा संमेलनाच्या चालकांचा हेतू दिसून येतो. हें संमेलन कांहीं बाबतींत नमुनेदार झालें यांत शंका नाहीं. पण त्यावेळीं झालेल्या टीकेवरून अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत त्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा आढावा घेण्याचा प्रयत्न केला तो कित्येकांस अप्रसंगीय वाटला. राजवाड्यांनीं 'वृद्ध गुरुजनांचा उपमर्द' केलेलाहि सदभिरुचीस सोडून होता. व संमेलनांत ग्रंथकारांस एकमेकांची ओळख करून घेण्याची संधि दिलेली नव्हती असें दिसतें.

: ६ :

बडोदें येथें ऑक्टोबर १९०९ मध्यें भरलेल्या संमेलनाचा कार्यक्रम थोडासा निराळा आंखला गेला होता. स्वागतपर, व अध्यक्ष रा. का. र. कीर्तिकर यांचीं भाषणें झाल्यावर रा. ब. वैद्य यांनीं मराठीला युनिव्हर्सीटीच्या अभ्यासक्रमांत स्थान मिळावें, व इतर विषयांचें शिक्षणहि मराठींतूनच दिलें जावें असा ठराव मांडला तो पास झाला. त्यानंतर डॉ. भांडारकर, रा. सा. कानिटकर, रा. गो. कृ. देवधर, हरप्रसादशास्त्री, व्ही. पी. माधवराव, रा. ब. वैद्य यांचीं "मराठी वाङ्मयांचा समाजावर परिणाम", "ऐतिहासिक सामग्री जतन करून ठेवण्याची आवश्यकता," "पुराण वस्तुसंशोधन", "मराठी भाषेची मूळपिठिका" इत्यादि विषयांवर भाषणें झालीं. शेवटीं चिटणीस रा. खाडिलकर यानीं परिषदेला "व्यवस्थित स्वरूप नाहीं, कार्यक्रम नाहीं, नियम नाहींत" असा कबुलीजबाब देऊन वंगीय साहित्य परिषदेचे नियम, योग्य ते फेरफार करून, महाराष्ट्र परिषदेस लागू करावे असा ठराव पुढें मांडिला. त्याबरहुकूम फेरवगैरे करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. परिषदेच्या उद्दिष्ट कार्यांत ऐतिहासिक कागदपत्रें व जुन्या कवींची अप्रसिद्ध काव्यें यांचे प्रकाशन व संरक्षण, शास्त्रीय विषयांची परिभाषा तयार करणें, मराठी सामुग्री जुळविणें इत्यादिकांचा चिटणिसांच्या भाषणांत उल्लेख केला गेला. या संमेलनांतच प्रथम निबंधांना सापत्नभावानीं वागविण्यास सुरवात झाली.

संमेलनांत वाचण्यासाठीं पुष्कळ लेखकांकडून निबंध मागविले होते व ते वाचून जमल्यास त्यांवरच चर्चाहि व्हावयाची होती. "पण संमेलनाचे अखेरीस त्या लेखांचा व लेखकांचा नामनिर्देश करण्यापलिकडे कांहींच करतां आलें नाहीं.

: ७ :

अशा रितीनें मराठी वाङ्मयाची वृद्धि व्हावी, उत्कर्ष व्हावा अशा बुद्धीनें झटणारांची परस्पर ओळख व्हावी व त्यांच्या वैयक्तिक प्रयत्नांस सुसंघटित स्वरूप येऊन तें जास्त फलदायी व्हावें या उद्देशानें गेल्या अर्धशतकांत अनेक साहित्य संमेलनें भरविलीं गेलीं. पण त्यांची वाङ्मयकार्यास काय मदत झाली, साहित्याच्या इष्ट वाढीला कितपत् हातभार लागला हें पाहूं गेल्यास पदरीं निराशाच येते. या संमेलनांच्या एकंदर कार्याचा आढावा काढल्यास संमेलनानें भारंभार ठराव पास करण्यापलिकडे कांहींच काम केलें नाहीं अशी प्रचीति येते. व थोडेसें खोलांत शिरून या ठरावांची मीमांसा केल्यास त्यांचें वैयर्थ्य दिसून येण्यासारखें आहे. पास केलेले ठराव सर्वत्र अमलांत आणण्यास लागणारी सत्ता ग्रंथकारांच्या संमेलनासारख्या संस्थेंत नसणार हें उघडच आहे. संमेलनांत कुठल्याहि विषयावर ठराव झाला असतां त्यास, 'ग्रंथकारांच्या एका सभेचें मत, एवढीच काय ती किंमत मिळणार. यामुळें ज्या विषयावर आपलें मत प्रगट केलें असतां त्या मतास मान मिळून त्याचा योग्य तो विचार होईल अशाच विषयावर व आपलें मत कितीसें व्यवहार्य आहे याचा पूर्ण विचार करून मत देणें हें संमेलनाचें कर्तव्य होतें. पण त्यानीं ही मर्यादा बाळगलेली दिसत नाहीं. ज्याला वाङ्मयाचा थोडासा देखील वास येतो अशा वाटेल त्या विषयावर आपलें मत त्यानीं धडाकून दिलें आहे व त्यांत त्यांनीं त्यांच्या शक्याशक्यतेचीहि कदर बाळगली नाहीं. हें वर दिलेल्या ठरावांच्या सारांशावरून दिसून येईल. ठराव पास करतांना पुढें ते अंमलांत आणण्याचें शक्य तेवढे प्रयत्न करणें आपलें कर्तव्य आहे ह्याचा संमेलनास पूर्णपणें विसर पडला असावा; किंवा कित्येक ठराव अगदीं Prima Facie ) अमलांत येणें आजच्या परिस्थितींत अशक्य असल्यामुळें त्यांच्याबरोबरच इतर ठरावांबद्दलची जबाबदारीहि आपोआप नाहींशी होते, अशी त्यांची कल्पना

झाल्यास नकळे. वारंवार तेच तेच ठराव निरनिराळ्या संमेलनापुढें येऊन पास व्हावे, पण मागील ठरावांबद्दल चौकशीहि होऊं नये (मोडी लिपीबद्दलचा ठराव अपवादादाखल) या प्रकारावरून दुसरें कांहीं अनुमान निघूं शकत नाहीं. ऐतिहासिक कागदपत्रें जमा होऊन छापून निघावींत व महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें विद्यार्थ्यांस सर्वत्र उपलब्ध व्हावींत, जुन्या कवींची काव्यें निरनिराळे पाठभेद व अर्थ निर्णयात्मक टीपा देऊन छापून निघावीं, मराठी भाषेंत विश्वकोश व शब्दकोश यांसारखे प्रचंड संदर्भग्रंथ तयार व्हावे, निरनिराळ्या विषयांवर उत्कृष्ट पुस्तकें निर्माण व्हावीं, असें निव्वळ ठराव केल्यानें वाङ्मय कार्यास किती मदत होते हें फोड करून सांगण्याची जरुरी नाहीं. १९०७–८ मध्यें राजवाड्यांचें "मराठ्यांच्या इतिहासांची साधनें, खंड ७ वा" हें पुस्तक संमेलनांमार्फत प्रसिद्ध झालें व चार सहा शास्त्रीय विषयांच्या परिभाषा तयार झाल्या एवढें वगळल्यास संमेलनानें या बाबतींत कांहींच प्रयत्न केलेले दिसत नाहींत इतकेंच नव्हे तर इतर लोकांनीं अशा कार्यास हात घातल्यास त्यांस संमेलनांकडून सक्रीय सहानुभूति कांहीं मिळालेली नाहीं. डॉ. केतकर यांनीं ज्ञानकोशाचे काम सुरू केलें त्यावेळीं त्यांच्या कामांत संमेलनाकडून मदत झाली नाहीं. इतकेंच नव्हे तर संमेलनातर्फें एक प्रतसुद्धां विकत घेतली गेली नाहीं. ज्ञानकोशाचें काम संपल्यावर मात्र केतकरांचें अभिनंदन करण्यास व याकामीं सरकारनें सहाय्य केलें नाहीं म्हणून दोष देण्याचा ठराव देखील पास होण्यास विलंब नाहीं! कांहीं प्रयत्न न करतां नुसती इच्छा प्रदर्शित करतांच इच्छित वस्तूची प्राप्ति होत असे. तो कल्पवृक्षांचा, व कामधेनूंचा काळ आतां राहिलेला नाहीं हें मोठें दुर्दैव तर खरेंच पण तें सत्य आहे. आणि तें जमेस धरल्यावांचून गत्यंतर नाहीं.

: ८ :

संमेलनाचें काम करण्यासाठीं म्हणून स्थापन झालेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याकडे नजर फिरविल्यास अशाच प्रकारची खेदजनक परिस्थिति दृष्टोत्पत्तीस येते. १९०६ सालीं ही संस्था जन्मास आली असली तरी पुढें सहा वर्षें नियम नाहींत, कार्य आंखलेलें



# तें स्वप्न

— रॉय किणीकर

— १ —

हा हठयोगी तुझ्या दारांत उभा आहे.
हे मानिनी, त्याचें स्वप्न त्याला परत दे.
कार्तिकेची मध्यरात्र पूर्वेला कलली आहे,
अष्टमीचा चन्द्र सावरीच्या रानावरून भटकतो आहे,
आणि त्या योग्याची झोप पार उडाली आहे.
जागरणाचा हा दाह त्याला आतां सोसवत नाहीं;
पायाच्या पोटऱ्या शिणल्या आहेत,
पाठीचा कणा सळसळतो आहे,
काळजाला आंतून कळ लागली आहे,
आणि म्हणूनच अशा अवेळी आणि अपरात्रीं
हा हठयोगी तुझ्या दारांत उभा आहे
हे मानिनी, त्याचें स्वप्न त्याला परत दे.

पण तें स्वप्न कुठे ठेवलें आहेस
तें तुला नीट आठवते का?
न्हाणीघरांत एक रंगीत चौरंग आहे,
चौरंगाखालीं एक रंगीत करंडा आहे,
सकाळीं अचैल न्हातांना त्या करंड्यांत तर
तूं तें स्वप्न ठेवले नाहींस ना?

देवघरांत उजव्या हाताला एक कोनाडा आहे,
कोनाड्यांत चांदीची एक कोयरी आहे,
दुपारीं देवावर फुलं वाहतांना त्या कोयरींत तर तूं
तें स्वप्न ठेवलें नाहींस ना?

अंगणांत डाव्या हाताला एक परसदार आहे,
परसदाराच्या वळचणीला एक चिपणें घरटें आहे,
सांजवेळीं धार काढतांना त्या घरट्यांत तर तूं
तें स्वप्न ठेवलें नाहींस ना ?

माडीवरच्या शयनगृहांत एक शिसवी मंचक आहे,
त्या मंचकाच्या कठड्यावर एक कुसुंबी रंगाची कांचोळी आहे,
रात्रीं पतिसन्निध जातांना त्या कांचोळीखालीं तर तूं
तें स्वप्न ठेवलें नाहींस ना !

हे मानिनी, तें स्वप्न कुठें ठेवलें आहेस ते नीट आठव,
त्या हट्टयोग्यावर दया कर,
आणि पहाटेचा कोंबडा आरवायच्या आंत
त्याचें स्वप्न त्याला परत देऊन टाक.

---

नाहीं, घटना नाहीं अशी तिची स्थिती होती. अकोल्याच्या संमेलनांत बडोद्याच्या कमिटीच्या सूचना मान्य करून साहित्य परिषदेची घटना व कार्यक्रम ठरविण्यांत आले. दरसाल कोठेंतरी संमेलन भरविणें हा परिषदेच्या कार्यातील एक भाग होता. मराठी भाषा व साहित्य वाढविणें, त्यांची उन्नति व विस्तार करविणें हे परिषदेचे उद्देश तडीस जाण्यासाठीं, मराठी भाषेचे कोश, इतिहास, व्याकरण इ. करणें, शास्त्रीय परिभाषा तयार करणें, प्राचीन काव्यें, ऐतिहासिक लेख व इतर महत्त्वाचे लेख प्रसिद्ध करणें व त्यांचें संशोधन करणें, निरनिराळ्या विषयांवर ग्रंथ लिहवून अगर परकीय भाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरें करवून तीं प्रकाशित करणें, साहित्य विषयक प्रश्नांची चर्चा करणें, इत्यादि विविध उपाय आंखून दिले होते. परिषदेमार्फत १९१३ पासून "महाराष्ट्र साहित्य पत्रिका" (त्रैमासिक) विविधज्ञानविस्ताराला जोडून निघूं लागली; गेलीं दोन वर्षे ती स्वतंत्रपणें प्रसिद्ध होत आहे. पत्रिकेंतील लेख एकंदरींत एकदेशी स्वरूपाचे असले तरी आपापल्यापरीनें चांगलें असतात हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं. लोकगीतें, लोककथा, म्हणी, भाषा प्रकार, जुन्या काव्यग्रंथांतून सांपडणारे भाषाविशेष, इत्यादि पत्रिकेंतून प्रसिद्ध होत असतात. याखेरीज गेल्या सतरा वर्षांत दोन तीन ग्रंथ लिहविले, त्यांतील एक प्रसिद्ध करून त्याच्या नवीन प्रति जुन्या बाजारांत आण्या दोन आण्यांच्या भावानें विकण्याची व्यवस्था केली, व मुशाहिरा देऊन लिहवलेले ग्रंथ प्रसिद्ध करावयाचें तसेंच राहून गेलें आहे. ज्या विषयांवर हें ग्रंथ लिहविले आहेत त्या विषयांवर चांगले ग्रंथ मराठींत सध्यां उपलब्ध आहेत, त्याअर्थी परिषदेचा हा खटाटोप फुकटच गेला असें म्हणणें क्रमप्राप्त आहे. मराठी साहित्य वाढविण्याचे इतर 'उपाय' योजण्याच्या कामास परिषदेनें अजून सुरवात केली नाहीं, व इतक्या लौकर करील असेंहि दिसत नाहीं.

: ९ :

आपल्या विद्वानांची साहित्यविषयक कार्याबद्दलची अनास्था व परिषदेच्या आणि संमेलनाच्या चालकांच्या स्वतःच्या कर्तव्याविषयीं भलत्या कल्पना ही दोन जबरदस्त कारणें आमच्या साहित्य संस्थांच्या क्रियाशून्यतेच्या मुळाशीं आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. एकदोन दाखल्यांवरूनच विद्वानांच्या अनास्थेची कोटि अजमावतां येण्यासारखी आहे. उपरनिर्निष्ट पारिभाषिक शब्दांच्या जंत्र्या तयार झाल्यावर कित्येक विद्वान साहित्यसेवकांकडे त्यांत दुरुस्त्या, सूचना करण्याचीहि विनंति केली होती. पण फारच थोड्याजणांकडून उत्तरें आलीं, असें त्यानंतर पांच वर्षांनी चिटणीसानीं एका भाषणांत सांगितलें आहे. तसेंच परिषदेच्या कार्यकारी मंडळांत कांहीं बाहेरगांवचे सभासद होते व आहेतहि. दर सभेच्यापूर्वी कांहीं दिवस सभेपुढील कामाचा आराखडा दर सभासदाकडे जातो. पण बाहेरगांवच्या सभासदानीं हजर रहातां येत नाहीं तर आपलें मत लिहून कळविलें, असे प्रसंग विरळा. परिषदेच्या कार्यकर्त्यांचा स्वतःच्या कर्तव्याविषयीं गैरसमज ठिकठिकाणीं दिसून येतो. आउतें आहेत पण त्यांचा उपयोग कसा करावा हें माहीत नाहीं अशा प्रकारची स्थिति आहे. कार्यकारी मंडळाच्या सभा भरवाव्या, जमतील तेवढ्या पैशांचा जमाखर्च ठेवावा, साहित्यपत्रिकेबाबत विविधज्ञानविस्तारास दोनशें रुपयांचें वर्षासन द्यावें, ज्या विषयांवर मराठींत चांगलीं पुस्तकें आहेत त्याच विषयांवर एक दोन पुस्तकें लिहिण्याची खटपट करावी, आणि शक्य तेव्हां संमेलन भरवावें, यांतच परिषदेची इतिकर्तव्यता संपलीं व वक्तृत्वोत्तेजक सभांचें स्वरूप आलेल्या त्या संमेलनांतून खूप ठराव एकदांचे पास झाले, व पास झाल्यावर पुन्हां त्यांच्याकडे पुढील संमेलनापर्यंत कोणीहि ढुंकून पाहिलें नाहीं तरी हरकत नाहीं—कीं वाङ्मय वाढविण्याचा व साहित्याची वाढ व उन्नती करावयाचा त्यांचा हेतू तडीस गेलाच. अशी कदाचित् परिषदेच्या कार्यकर्त्यांची भावना असल्यास नकळे. या मनोरचनेचें आणशी एक उदाहरण दिल्यास मुद्दा स्पष्ट होण्यासारखा आहे. जुन्या पोथ्या वगैरे तपासून जुन्या मराठी काव्यांच्या विश्वसनीय संहिता ( text ) तयार करविणें व त्या पाठभेदादि टीपांसह छापविणें हें परिषदेच्या प्रधान कर्तव्यांपैकीं एक होय. पण तें अल्पांशानें का होईना, बजाविण्याची संधी मिळाली असतां परिषदेनें तिचा उपयोग करून घेतला नाहीं. असा उपक्रम सुरू केल्यास परिषदेस प्रकाशन शाखाहि उघडतां येऊन आर्थिक दृष्टीनेंहि फायदा होण्यासारखा आहे, हेंहि त्यावेळच्या कार्यकारी मंडळास अवगत होतें. पण पुस्तकें विकून पैसे मिळविणें त्यांना लाजिरवाणें वाटलें. भिक्षांदेहि करूनच एखादी संस्था चालविण्यांत व तिच्यातर्फे न खपणारींच पुस्तकें छापून प्रसिद्ध करण्यांत काय विशेष श्रेय आहे तें त्यांचें त्यानांच ठाऊक !

: १० :

येथपर्यंत महाराष्ट्र साहित्य संमेलन व परिषद यांच्या इतिहासाचा व कार्याचा विचार झाला; त्यावरून या संस्थाची काम करण्याची पद्धत अजिबात चुकलेली आहे व ती बदलणें

( पुढें पान ४६ वर चालू )




**अ नं त  का णे क र**

*त्या जुनाट, धुरकट आणि कोळिष्टकांनीं भरलेल्या मंदिरांत अनेक साप वेटोळीं करून पडले होते. ते इतके निश्चळ होते, कीं वाटले ते मातीचे साप असावेत; पण पांच दहा मिनिटांनीं एकानें हळूच डोकें हालविलें आणि जिभेचीं दोन टोकें बाहेर काढलीं.*

# नागपूजकांच्या  देशांत

डोंगरावर गाडी सरसर वर जाऊं लागली. पांचशें फुटाची पाटी दिसली. कांहीं वेळानें हजार फुटांची पाटी आली. एका छोट्याशा बोगद्यांतून बाहेर आल्यावर 'टनेल' स्टेशनांत गाडी उभी राहिली. मध्येंच एक 'क्लेअरमॉट्' नांवाचें स्टेशन लागलें. डोंगरावरल्या गर्द झाडींत छोट्या छोट्या सपाटीवर एखादा दुसरा बंगला किंवा चिनी बायका मुलें वावरत असलेल्या झोंपड्या दिसत. 'टनेल' स्टेशनांत सहलीसाठीं चाललेले चिनी विद्यार्थी आणि चिनी जोडपीं उतरलीं.

हजार पंधराशें फूट उंचीवरून पिनांग शहरांतल्या घरांचीं तांबडीं छपरें, पांढऱ्या घरांचे पुंजके, बंदरापासून पलिकडल्या मलायाच्या मुख्य भूमीपर्यंत गेलेला निळसर समुद्राचा फाटा, हा देखावा एखाद्या चित्रांतल्यासारखा दिसत होता. मध्येंच दोनचार काळे-पांढरे ढग आमच्या खालून जाऊं लागले, आणि खालचें कांहींच दिसेनासें झालें. गाडी वर जात असतां डोंगरावर ओळखीचीं चांफ्याचीं झाडें एके ठिकाणीं दिसलीं. एका झाडाला रामफळांसारखीं पण वर फणसाच्या कांट्यासारखे कांटे असलेलीं फळें दिसलीं. या फळांचें नांव 'आसोंका' कीं असेंच कांहींसें रमणनें सांगितलें. आंत फणसासारखेच पांढरट रंगाचे गरे असतात, तो म्हणाला. जांभळ्या-पिवळ्या रंगाचीं फारच सुंदर फुलें असलेलें एक नवीनच झाड मध्येंच दिसलें. पंधराशें फुटांवर आल्यावर गाडी बदलावयाची असते. बाजूलाच दुसरी गाडी होती. तिच्यांत जाऊन बसावयाचें, आणि शेवटचे, हजार फूट तिच्यांतून वर जावयाचें. वर जाऊन पोहोचल्यावर दाट हिरव्या झाडींतले टुमदार बंगले, वरखालीं जाणारे स्वच्छ चिमुकले रस्ते, पांढऱ्या भिंती आणि तपकिरी खिडक्यांचें रेखीव पोलीस स्टेशन हें सर्व पाहून थंड हवेच्या ठिकाणीं आल्यासारखें वाटलें. पण पंचवीसशें फुटांवरसुद्धां इथें फारसें थंड नव्हतें. इथल्या 'समिट् रोड' वरून फिरतांना कांहीं मजेदार झाडें मला दिसलीं. डोंगर-कपारींत वाढलेले किंवा कुंड्यांतले चिंचेसारख्या बारीक पानांचे नेचे आपण पहातों. फुलांच्या गुच्छाभोंवती हे हिरवे नेचे लावतात. इथें मोठी उंच वाढलेलीं झाडें आणि त्यांच्या फांद्या नेच्यासारख्या होत्या. दुसरें एक झाड दिसलें त्याला भेंड्यासारखें लांबट, खालीं टोंक करून लोंबत असलेलें देंठाकडे लाल आणि टोंकाकडे पांढऱ्या रंगाचें फूल होतें. इथें रस्त्यांतल्या पाट्यावर चार भाषा दिसतात. अरबी लिपींत लिहिलेली मलायी भाषा, तिच्या खालीं चिनी, तिच्या खालीं तामीळ आणि शेवटीं इंग्रजी. भिन्न भाषिक उपऱ्यांची गर्दी झाल्यामुळें मलायी राष्ट्राच्या भवितव्याची काळजी वाटते.

खालीं उतरतांना एक रबराचें झाड दिसलें. कोणत्याही झाडासारखें मोठ्या पानांचें उंच झाड होतें. बुंध्याभोंवती साल खरवडून चार बोटें रुंदीचा पट्टा केलेला दिसत होता. त्या पट्ट्यांत एक बोटभर लांबीचा वांकवलेला पत्रा खोंचलेला होता. त्याच्या खालीं तारेनें बांधलेलें एक पत्र्याचें डबडें होतें. या डबड्यांत रात्रभर दुधासारखा पांढरा चीक ठिबकतो. तो सुकला कीं रबर झाला.

आमच्या डब्यांत समोरच्या बांकावर चिनी पद्धतीचा तंग फ्रॉक घातलेली एक अतिशय सुंदर चिनी तरुणी आणि अद्यावत् शर्टपॅंट घातलेला, उत्कृष्ट इंग्रजी बोलत असलेला एक चिनी तरुण बसला होता. बरेंचसें आयुष्य उष्ण देशांत काढल्यामुळें काळवंडलेला आणि खडबडीत झालेला, खाकी शिकारी वेषांतला एक निळ्या डोळ्यांचा उंचेला इंग्रज त्या दोघांबरोबर गोष्टी करीत होता. तो सांगत होता, 'जुन्या गॅझेटमध्यें मी वाचलें कीं इथें शंभर वर्षांपूर्वी चौदा हजार एकर जमीनींत लवंग आणि जायफळ पिकवलें जात असे. अलिकडे फक्त दोनशें ऐंशीं एकर जमीन त्या पिकासाठीं वापरतात.' डोंगरांत एके ठिकाणीं एक मलायी म्हातारी चणे विकायला बसली होती. आपण ज्याप्रमाणें कागदाचा निमुळता पुडा चणेकुरमुऱ्याकरतां करतों तसाच पण पानाचा पुडा करून ती चणे देत होती. आम्ही पायथ्याशीं आलों तेव्हां दुपारचा दीड वाजला होता.

बसमधून घरीं जायला निघालों. पण रेल्वे-स्टेशनापासून बसस्टेशनापर्यंत ट्रॅमनें जावें लागलें. इथल्या ट्रॅम अगदींच लहान आणि खडबडीत आहेत. बांकावर जागा नसली तर मागल्या बाजूला एक गॅलरी असते तिथें उभें रहायचें. गॅलरींत उभें राहून रस्त्यावरली मजा

पहाणें मात्र चांगलें जमतें. गांवाजवळ आल्यावर तामीळ लोकांचें एक जुनें भद्रा-देवीचें देऊळ एका गल्लीच्या तोंडावर दिसतें. गणपतीहि एके ठिकाणीं दिसला. विडा खाऊन रस्त्यांत थुंकणारे कांहीं तामीळ भाईबंद दिसले तेव्हां तर हिंदुस्थानांतच आहों असें वाटलें. एका घरावर 'पिनांग हिंदू सभा' अशी इंग्रजी पाटी दिसली. दुसऱ्या एका घरावर 'पिनांग इंडियन काऊन्ज् मिल्क ट्रेडिंग ॲसोसिएशन' अशी पाटी होती! चुलीया स्ट्रीट्मध्यें ठाकोरलालांच्या घरीं पोहोचलों तेव्हां दोन वाजले होते.

ठाकोरलाल आमची वाटच पहात होते. घर सोडल्यापासून भात, भाजी, आमटीचें जेवण मिळालें नव्हतें. फुलके, भाज्या, भात, पुरणपोळी, ताकाची कढी वगैरेंवर हात मारतांना समाधान वाटलें. जेवल्यानंतर थोड्या वेळानें म्हणजे तीनच्या सुमारास पुन्हां बाहेर पडावयाचें होतें. ठाकोरलालांची गाडी त्यांच्या मित्राच्या बायकोचें ऑपरेशन असल्यामुळें तिकडे गेली होती. दुसऱ्या एका मित्राची मोठी थोरली प्लिमथ गाडी त्यांनीं आमच्यासाठीं बोलावून ठेवली होती. यावेळीं रमण आणि त्यांचा भाचा मोहन दोघेही आमच्या बरोबर येणार होते. तीनला आम्ही बाहेर पडलों. मोहनचें वय अठराएकोणीस वर्षांचे असेल. दोनतीन वर्षांपूर्वी या मुलांना ठाकोरलालांनीं पिनांगला बोलावून घेतलें. मोहन फार चलाख पोरगा आहे. दोन तीन गुजराती इयत्तांपलीकडे त्याचें शिक्षण झालेलें नाहीं. पण धंद्यांतल्या, गांवां-तल्या हजार गोष्टी तो आम्हाला सांगत होता. मलायी, हिंदी, इंग्रजी या तिन्ही भाषा तो कामापुरत्या वापरूं शकत होता. स्वयंपाक करणें, झाडू मारणें या कामापासून तों पत्रें टाईप करणें, हिशेब ठेवणें या कामापर्यंत वेळप्रसंगीं आपण वाटेल तें करूं शकतों म्हणून तो सांगत होता. दिवसभर खूप काम केलें म्हणजे मला शांति वाटते, तो म्हणाला. मामाच्या तालमींत तो चांगलाच तयार झाला होता. बारातेरा मैल दूर असलेल्या बायेन लबस भागांत असलेलें चिनी लोकांचें सर्पमंदिर आधीं पहावयाचें आम्हीं ठरविलें होतें. वाटेंत खेडवळ विभागांतून जातांना चिनी लोकांचीं झोपडीवजा लाकडी घरें दिसलीं. या घरांची रचना मजेदार होती. जमिनींत हात दोन हात उंच खांब पुरलेले, त्या खांबावर तक्तपोशी, आणि खोल्या. एक खोली दोन हात उंचीच्या खांबावर, तर दुसरी वरच्या मजल्यासारखी दिसणारी चार हात उंचीच्या खांबावर! कांहीं पक्की वीटचुन्यांचीं टुमदार घरेंही अशीच खांबांच्या पायावर बांधलेली दिसलीं, बारा महिने पाऊस,-तेव्हां ओलसरपणा घरांत येऊं नये म्हणून या पद्धतीनें घरें बांधतात कीं काय नकळे.

चिन्यांचें सर्पमंदिर हें एक अजब देऊळ आहे. चिनमध्यें किंवा इतरत्र कुठें बुद्ध धर्म आहे तिथें असलें दुसरें एखादें देऊळ आहे कीं नाहीं याची मला कल्पना नाहीं. देऊळ तसें मोठें नाहीं, पण बरेंच जुनाट दिसतें.



त्याची रचना अर्थात् कानटोपीच्या वर केलेल्या कानांसारख्या छपरांची चिनी आहे. दरवाजासमोर बाहेरच्या आवारांत दोन हातांच्या आवाक्यांत मावणार नाहीं एवढ्या मोठ्या नक्षीकाम केलेल्या पितळेच्या भांड्यांत भस्म भरलेलें होतें आणि त्यांत बोटाएवढ्या जाड चंदनचूर्णाच्या उदबत्त्या जळत होत्या. आंतहि असल्याच भांड्यांत उदबत्त्या जळत असल्यामुळें जिकडे तिकडे धूर आणि चन्दनाचा घमघमाट पसरला होता. आंतल्या जुनाट लाकडी खांबावर चिनी पद्धतीची नक्षी होती. आंतलें सर्व कांहीं जुनाट, धुरकट, कोळिष्टकांनीं भरल्यासारखें दिसत होतें. आंत छपराच्या एका कोपऱ्यांत एक भली मोठी जुनाट घंटा आणि दुसऱ्या कोपऱ्यांत एक काळवंडलेला नगारा टांगलेला होता, मधल्या चौथऱ्यावर दोन बाजूला दोन पितळेच्या कुंड्या होत्या आणि त्यांत हात दीड हात उंचीचीं, पानें नसलेल्या शुष्क फांद्यांचीं झाडें होतीं. या फांद्यांवर आडवे पांढरे पट्टे असलेले हिरव्यागार रंगाचे लहान लहान साप वेटोळीं करून पडले होते. ते इतके निश्चल होते कीं मला पहिल्यांदा वाटलें ते मातीचे खेळांतले रंगीत साप असावेत! पांच दहा मिनिटांनीं त्यापैकीं एकानें डोकें हालवलें आणि जिभेचीं दोन टोकें बाहेर काढलीं तेव्हां ते जिवंत आहेत याबद्दल आमची खात्री पटली. भिंतीला एक फळी होती तिच्यावर धूळ खात पडलेल्या कागदांत दोनतीन साप दिसले. तेही तसेच पडून होते. क्वचित् थोडीशी हालचाल करीत. एका कोपऱ्यांत पातळ लाल कागदांत गुंडाळलेल्या चंदनी उदबत्त्या विकणारा सुरकुतलेल्या चेहऱ्याचा म्हातारा चिनी बसला होता. त्यांच्या पुढ्यांत एक जाडजूड लांब वही होती. तिच्यांत सही करायची आणि खुषी असेल तर सेवकाला कांहीं पैसे द्यायचे. त्याच्या डोक्यावरल्या फळीवर सुद्धां दोन तीन साप सुस्तपणें इकडून तिकडे वळत होते. त्यांच्या शेजारींच असलेल्या कांचेच्या बरणींत अंडीं दिसलीं. सापांना अधून मधून तीं खायला घालीत असावेत. नाहींतर तिथें पडल्या.पडल्या ते दुसरें खाणार काय? हे सर्व साप इतके सुस्त आणि पडल्या जागेवरून फारशी हाल-चाल न करणारे होते कीं त्यांची भीति अशी वाटेच ना. चांदूरकर म्हणाले यांना अफू चारतात कीं भक्तांनीं सतत जळत ठेवलेल्या या चंदनी उदबत्त्यांच्या धुरामुळें ते असे कायमच्या गुंगींत रहात कांहीं कळत नाहीं. एक गर्भवती चिनी स्त्री सापांच्या त्या कुंड्यां समोर गुढगे टेकून त्या जाड चंदनी उदबत्त्या भक्तिभावानें ओवाळीत होती. कांहीं म्हाताऱ्या चिनी बाया आपण देवाला नमस्कार करतो तसेंच हात जोडून त्या सापांना नमस्कार करीत होत्या!

देवळाच्या बाहेर पलिकडल्या बाजूला सर्व बाजूंनीं जाळी लावलेल्या एका टाकींत अज-गरासारखें वेटोळें करून निश्चल पडलेले दोन प्रचंड साप होते. जाळींतून काठी घालून हालवले तरी ते हालत नव्हते. टाकीजवळच्या

एका कुंडींत छोट्या छोट्या हिरव्यागार पानांचें एक झुडुप होतें. त्याच्या फांद्यांना गुंडाळून वेऊन तीनचार साप पडले होते.

सर्पमंदिराकडून पिनांगचे हौशी लोक जियें सुट्टीच्यादिवशीं सहलीकरतां जातात त्या 'वॉटर फॉल गार्डन्स' कडे जायला आम्ही निघालों. 'ग्रीनलँड' नांवाच्या हिरव्यागार डोंगराळ भागांतून आमची मोटर जात होती. या भागांत ब्रिटिश आणि चिनी श्रीमंतांचे सुंदर टुमदार बंगले आहेत. अर्धी भिंत पांढरी तर अर्धी तांबड्या विटाची अशा वेगवेगळ्या कल्पना प्रत्येक बंगल्याच्या बांधणींत दिसतात. वाटेंत रेसकोर्स लागला. हिरव्यागार डोंगराच्या पायथ्याशीं हें शर्यतीचें मैदान आहे. आणि त्याचे तारांचें कुंपणहि हिरव्यागार वेलींनीं भरून गेलें आहे. एके ठिकाणीं 'आयेर इतेम्' अशी इंग्रजी पाटी दिसली. मलायींत 'आयर' म्हणजे पाणी. मोहन म्हणाला, 'या भागाचें नांव 'आयर इतेम' किंवा 'काळे' पाणी!' ही बाजू तर चांगली हिरवीगार, सुंदर सुंदर बंगले असलेली होती.

'वॉटर फॉल गार्डन्स'चा विस्तार खूप मोठा आहे. डोंगरावरून कोसळत असलेला एक लहानसा धबधबा एका बाजूला आहे. फिरायला आलेल्या श्रीमंत चिनी किंवा युरोपियन लोकांच्या एकाहून एक सुंदर आणि भव्य मोटारगाड्या बाहेर उभ्या होत्या. आंत मोठमोठे वृक्ष, राया, लिलीफुलांचें एक तळें (लिली-पॉंड्), वरखालीं जाणारे डोंगराळ रस्ते आणि चिमुकले लाकडी पूल आहेत. बांबूसारखा उंच वर गेलेला सोट आणि नारळीच्या झावळ्यासारखीं पानें असलेलीं कांहीं झाडें इथें पाहिलीं. त्यांच्या बांबूसारख्या दिसणाऱ्या खोडाचा मुळापासून अर्ध्यापर्यंत हिरवागार रंग होता, तर वरच्या अर्ध्याचा कुणी तरी रंगवल्यासारखा तांबडालाल होता चिमुकलीं माकडें इकडून तिकडे उड्या मारीत होती, आणि जाणाऱ्या येणाऱ्याकडे कांहीं खायला मिळेल या आशेनें मध्येंच थांबून पहात होतीं. एक हायलँडर सैनिक त्यांना शेंगा टाकीत होता. मोहननें कुठून तरी मंगीस्तान नांवाचीं फळें आमच्यासाठीं आणली होतीं. बाहेरून पीचसारख्या दिसणाऱ्या या फळांत रामफळासारख्या बिया होत्या. माकडापुढें हें फळ टाकलें तर तें खाईना!

बागेच्या बाहेर पडलों आणि चहा कुठें चांगला मिळेल म्हणून मी इकडे तिकडे पाहूं लागलों. जवळच एक 'योकांग' नांवाचें चिन्याचें चहाचें दुकान दिसलें. दाराजवळच एक मोठी थोरली काळ्या अक्षरांतली पिवळी पाटी होती; आणि तिच्यावर 'इथें दिवसा रात्रीं केव्हांही समुद्रांतले ताजे खेकडे मिळतात' असा इंग्रजी मजकूर होता! तांबड्या काळ्या, काळ्या पाठीवर पांढरे ठिपके असलेल्या लांबलांब पायांच्या लहानमोठ्या खेकड्यांची एक लांबच लांब माळ दाराशीं तोरणासारखी लावली होती! 'इथें चहा



मिळेल ना?' मी भीतभीत मोहनला विचारलें. 'हो हो, चहा मिळतो कीं इथें.' तो म्हणाला. आम्ही आंत गेलों तों सगळीं टेबलें चिनी तरुणतरुणींनीं भरून गेलीं होतीं. एखादा दुसराच चहा घेत होता. बाकी सर्वजण मोठमोठे उकडलेले खेकडें दांतांनी कडकडा फोडण्यांत आणि बशींतल्या तांबड्या लाल चटणींत त्यांचें मांस बुडवून मटामट खाण्यांत गुंतले होते. प्रत्येक टेबलावर खेकड्यांच्या फुटक्या तुटक्या कवचांचे आणि चोखून टाकलेल्या पायांचे लहान लहान पुंजके इतस्ततः पसरले होते. आणखी आंत डोकावून पाहिलें तों भट्टीजवळ चिनी आचारी उभा होता आणि मोठ्या थोरल्या टोपांत खेकडे रटरटा उकडले जात होते! आंत बसायला जागा नव्हती म्हणून बाहेर उघड्या जागेंत असलेल्या एका रिकाम्या टेबलाशीं जाऊन आम्ही बसलों. नाहीं तरी आंत दरवळणाऱ्या खेकड्यांच्या दिव्य वासानें डोकें भणाणलेंच होतें! चहा ही चीजच मुळांत चिनी असल्यामुळें कीं काय नकळे, त्या दुकानांतला चहा मात्र खरोखरच चांगला होता.

तिथून पुढें जात असतां वाटेंत एक मोठें थोरलें पणुल सुब्रम्हण्याचें देऊळ दिसलें. तिथें मोटर उभी करून आंत गेलों कुणा तरी श्रीमंत चेट्टियारानें हें बांधलें आहे म्हणतात. मंदिर मोठें आहे, पण वास्तु कलेच्या दृष्टीनें आंत बाहेर सर्व कांहीं भडक आणि बेरंग अभिरुचीचें आहे. भल्या मोठ्या सभामंडपांतून पुढें गेलें कीं गाभारा दिसतो. तो लाल, हिरव्या, निळ्या, पिवळ्या फेंदरक्रीट किंवा कलरक्रीट सिमिटाचा आहे. नक्षीचे दगडी खांब किंवा महिरपी वगैरे कांहीं नाहींत. गाभाऱ्यांतल्या तामीळ पुढाऱ्यानें मोठ्या आस्थेनें भस्म आणि चन्दनाचें गंध आम्हांला दिलें. प्रवेशद्वाराशीं लाकडांत कोरलेले या देवळाचे रंगीत द्वारपाल मात्र खूप मोठे आहेत.

या शहरांत चिनी लोकांच्या शाळा, बंगले, घरें, दुकानें ज्याप्रमाणें मोठमोठीं आहेत, त्याप्रमाणेंच त्यांची स्मशानभूमीही खूप विस्तीर्ण असून आंत थडगींही असंख्य आहेत. जगणारे चिनी पुष्कळ आहेत. त्याअर्थी मरतातही पुष्कळ यांत आश्चर्य नाहीं! चिनी थडग्यांचा विशिष्ट आकार असतो. अर्धवर्तुळाकार वीत दीडवीत उंचीची पांढरी भिंत, आणि त्या भिंतींत मध्यें बसवलेला चौकोनी पांढरा दगड असतो, या दगडावर बहुधा मृताचें नांव कोरलेले असावें. पिनांगच्या बाजारांत एके ठिकाणीं ताबुतासारखे उंचउंच कागदी मनोरे आम्हांला दिसले होते, चिन्यांच्या प्रेतयात्रेंत हे मनोरे ताबुतासारखे मिरवत नेतात म्हणे.

सकाळीं हिल स्टेशनवर गेलों होतों तेव्हां वरून खालीं पहातांना दूर एके ठिकाणीं हिरव्यागार झाडींत मोठमोठें दोन तीन पांढरे तलाव आणि त्यांतलें निळें पाणी दिसत होतें. पिनांग शहराला जिथून पाणी पुरवलें जातें तें हें 'गिलमार्ड रिझर्व्हॉयर'. चार ठिकाणीं पाण्याच्या चादरी या तलावांत पडत असतात. इथल्या छोट्या छोट्या

अनुक्रमणिका

इमारती आणि त्यांचीं घुमटें स्वच्छ पांढरीं आहेत तर खिडक्या–दारांचा रंग फिकट निळा आहे. पिनांगमधल्या मार्केटाचा आणि कांहीं ऐटदार दुकानांचा रंगही असाच निळा–पांढरा आहे. स्वच्छ सूर्य-प्रकाश आणि स्वच्छ निळें आकाश दररोज पहाणाऱ्या या लोकांना या दोन रंगांची विशेष आवड दिसते ! इथें कांहीं चमत्कारिक झाडें पाहिलीं. मोठमोठ्या पानांचीं सुरूसारखी उंच हीं झाडें आहेत. बुंध्यापासून पांचसहा फुटांवर वर वळलेल्या रुंद पानांची खोडाभोंवतीं एक टोपली झालेली आणि या टोपलीच्या तळापासून खाली, आकाशदिव्याच्या लोंबत्या शेपट्या असात तशी लोंबणारीं लांब हिरवीं पानें. कदाचित् मुख्य झाडावर उगवलेला हा बांडगुळाचा एखादा प्रकार असेल. पिनांगमध्यें आल्यापासून जिकडे तिकडे अमूप हिरवी झाडी दिसत होती, पण तिच्या मानानें पक्षी जवळजवळ दिसलेच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. आम्ही या गोष्टीचें आश्चर्य करीत होतों. चांदूरकर म्हणत होते, इथें जिकडे तिकडे नारळीफोफळींचा सुकाळ दिसतो—इतर पिकें कांहीं दिसतच नाहींत, तेव्हां पक्षी खाणार काय ? म्हणून पक्षी नाहींत. या तलावाच्या आसपास मात्र चिमण्यांसारखे कांहीं थोडे पक्षी भुरभुरतांना दिसले.

आतां आम्ही जात होतों त्या विभागाचें नांव ' वालेक् पुलाव '. समुद्रकाठीं मलबार हिलसारखी ' माऊन्ट प्लेझर ' नांवाची टेकडी आहे. या टेकडीवर एक झोंकदार पोहण्याचा तलाव आहे, आणि तलावाच्या कांठाशींच एक ऐटदार हॉटेल आहे. श्रीमन्त चिनी स्त्रीपुरुष मोटारींतून इथें मौज करायला आले होते. तलावाच्या काठाशीं खुर्च्याटेबलावर पेयें घेत ते बसले होते. रबराचे फुगवलेले रंगीत घोडे किंवा रंगीत रबरी फुगे घेऊन गुटगुटीत चिनी मुलें तलावांत मनसोक्त डुंबत होतीं.

जुहूसारख्या लांबच लांब समुद्रकिनाऱ्याशीं ' लोन पाईन् ' नांवाचें एक प्रख्यात हॉटेल एका एकांत जागीं आहे. इथल्या युरोपियनांचें हें फार आवडतें हॉटेल. आम्ही सहज त्या बाजूला गेलों. कांहीं

---

[ पान ४२ वरून चालू ]

अत्यावश्यक आहे हें दिसून येईलच. आतां कोणत्या दिशेनें प्रयत्न झाले असतां या संस्था उपयुक्त होतील याचें थोडक्यांत दिग्दर्शन करून हा लांबलेला लेख आटोपतां घेतों. साहित्य संमेलनाच्या एका ठरावानें महाराष्ट्र साहित्य परिषद ही महाराष्ट्राची मध्यवर्ति साहित्य संस्था झालेलीच आहे. तिच्या पुनर्घटनेचा विचार होणें जरूर आहे व ही पुनर्घटना करतांना आपणांस कार्य करावयाचें आहे ही भावना मनांत वागविणें इष्ट आहे. जुन्या कवींचीं काव्यें तपासून शुद्ध करून व टीपा देऊन प्रसिद्ध करण्याबाबत परिषदेनें विचार करावा. ग्रंथरूपानें एकदम प्रसिद्ध करण्यास आज द्रव्याची अनुकूलता नसेल तर हीं साहित्यपत्रिकेंतून प्रसिद्ध केल्यास चालतील. पत्रिकेंत लेख वगैरे देणें बंद करून हिंदी साहित्य पत्रिकेप्रमाणें जुन्या वाङ्मयाचें प्रकाशन तिच्यांतून करण्याचें योजिल्यास कांहीं नुकसान होण्यासारखें नाहीं. कारण पत्रिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांपैकीं कित्येक इतर नियतकालिकांतहि प्रसिद्ध होणें शक्य आहे. तसेंच कार्यकारी मंडळाच्या घटनेंत थोडासा बदल करणें इष्ट आहे. बाहेरगांवचे सभासद कार्यकारी मंडळांत निवडले गेले तरी त्यांना सभांस हजर रहातां येत नाहीं. व दर सभेचा कोरम भरण्याची वाट पहात किती तरी वेळ घालवावा लागतो. कार्यकारी मंडळाचे सभासद मुंबईचे ( किंवा ऑफीस जेथें असेल तेथचे ) असावेत असा निर्बंध असल्यास मंडळ खरोखरीच ' कार्यकारी ' होण्याची आशा आहे.

: ११ :

साहित्य संमेलन हें या मध्यवर्ती साहित्य परिषदेचें संमेलन वार्षिक बैठक–समजलें जावें व ती बृहन्महाराष्ट्रांतील निरनिराळ्या ठिकाणीं भरविण्यांत यावीं अशा संमेलनाच्या कार्यक्रमांत थोडासा दिखाऊपणा झाला तरी त्यांत कांहीं गर्ह्य मानण्याचें कारण नाहीं. संमेलन तीन दिवसांचें असल्यास पहिल्या दिवशीं संमेलनाध्यक्षाचें भाषण होऊन त्याच दिवशीं आवश्यक व व्यवहार्य जेवढे ठराव असतील त्यांचा विचार व्हावा. ठराव व भाषणें हीं गौण आहेत. निबंधवाचन व साहित्यचर्चा हे संमेलनाचे प्रधान हेतू असल्यामुळें राहिलेले दोन्ही दिवस त्यांसच देण्यांत यावे. या दोन दिवसांत संमेलनाचें काम शाखा पाडून शाखांच्या अध्यक्षांच्या नियंत्रणाखालीं चालावें अशा रीतीनें एकाच विषयावर व्यासंग करणाऱ्या निरनिराळ्या विद्वानांस एकत्र परस्परांशीं विचारविनिमय व स्नेहवर्धन करतां येईल व हा संमेलनाचा दुसरा मुख्य हेतू होय. १९०६–७ च्या संमेलनांत साहित्य चर्चाच प्रामुख्यानें केली गेली. त्याविषयीं तत्कालीन चिटणीस म्हणतात, " प्रमुख विद्वानांत स्नेहसंबंध उत्पन्न करणें हा संमेलनाचा प्रधान हेतू होय. " संमेलन म्हणजे दोन दिवस एकत्र जमून लेखकांनीं काव्य-शास्त्र-विनोद करण्यांत काढावे, याचा व्यावहारिक उपयोग कांहीं नाहीं अशी टीका करणारांस उत्तर देतांना ते पुढें म्हणतात, " लेखकांचा परस्परांशीं परिचय व विचारांचे परस्परांशीं प्रत्यक्ष दळणवळण घडण्याचे प्रसंग संमेलनामुळें येतात, परस्परांच्या मनांतलें किल्मीष पुष्कळ अंशानें दूर होतें व खरें संघटन वाढतें. या गोष्टींची व्यावहारिक किंमत कांहींच का नाहीं ? " संमेलनाच्या संस्थापकांची व आद्य पुरस्कर्त्यांचीहि कल्पना अशीच होती असें मानण्यास जागा आहे. तसेंच वाचण्यासाठीं व चर्चेसाठीं निबंध येतील ते साधारणपणें संशोधनात्मक स्वरूपाचे असल्यास मराठी वाङ्मयाच्या भावी इतिहासकारांना त्यांचा उपयोग होण्यासारखा आहे. उदा० रा. न. र. फाटक यांनीं रामदासी ग्रंथांचें संशोधन करून कोणत्या संस्कृत व मराठी ग्रंथांची छाया रामदासांच्या ग्रंथरचनेंत दिसून येते तें स्थळनिर्देश करून विशद केलें आहे. अशाप्रकारेंच तौलनिक व सोपपत्तिक संशोधनकार्य संमेलनापुढें यावें. आज वादग्रस्त असलेल्या कित्येक विषयांवर उदा० विष्णुशास्त्री चिपळूणकरांची खरी योग्यता, रामदासांचें राजकारण, अनुच्चारित अनुनासिक, शास्त्रीय परिभाषा इत्यादिकांवर मी सुचवीत आहे अशाप्रकारची चर्चा झाल्यास ती मोठी उद्बोधक व फलदायी होईल यांत संशय नाहीं. निबंधासाठीं विषय नेमून देण्याची सध्यांची पद्धत अगदींच हास्यास्पद असल्यामुळें ती शक्य तितक्या लौकर बंद करणें इष्ट आहे.

• •

अनुक्रमणिका

गोरे स्त्रीपुरुष बाहेर हिरवळीवरल्या खुर्च्या–टेबलाशीं पेयें घेत बसले होते. पांढऱ्या शर्ट-विजारींतल्या एका धिप्पाड दाढीवाल्या साहेबाला पाहून कॉनरॅडच्या या प्रदेशाच्याच पार्श्वभूमीवर लिहिलेल्या कादंबऱ्यांतल्या कप्तानांची आठवण झाली. त्याच्या पायाला त्याचें छोटेंसें काळें माकड चिकटून बसलें होतें. त्याच्या गळ्यांतली सांखळी ओढून तो त्याला 'खालीं उतर' म्हणत होता. तें अधिकच घट्ट चिकटूं लागलें. खुर्चीवरून उठून त्यानें इकडून तिकडे धांवून पाहिलें. तें माकड त्याच्या पायाला तसेंच चिकटून राहिलें! 'लोन् पाईन' मधून बाहेर पडून रस्त्याला लागलों असतां एक भव्य बंगला दिसला. बागेच्या दारावर 'राम विलास' अशा नांवाची पाटी होती. कुणा तरी श्रीमंत तामीळाचा असावा.

दक्षिण फ्रान्समधल्या रिव्हिएराइतकाच प्रख्यात असलेल्या 'तांजॉंग बुंगा' या पिनांगच्या समुद्रकिनाऱ्यानें आमची मोटार चालली होती. वैभवशाली हॉटेलें आणि पोहण्याचें तलाव या किनाऱ्यावर इतस्ततः पसरलेले आहेत. 'तांजॉंग बुंगा' म्हणजे, मला वाटतें सर्व किनाऱ्यांचें फूल!

मुंबईच्या समुद्रकिनाऱ्याजवळून जाणारा जसा 'मरीन ड्राईव्ह' हा रस्ता आहे तसाच इथें 'गुर्नी ड्राईव्ह' आहे, या रस्त्यानें गांवांत जायला आम्हीं वळलों. वाटेंत खजुराच्या झाडांचा एक मळा दिसला. एका मोठ्या जुनाट पिवळ्या इमारतीवर 'शांघाय अंडरग्राऊंड हॉटेल' असें नांव दिसलें. भूमिगत हॉटेल म्हणजे काय म्हणून मोहनला विचारलें. तो म्हणाला, खालीं तळघरांत छानदार खोल्या करून, खाण्यापिण्याची इथें व्यवस्था केली आहे. पांढरीशुभ्र, किती तरी लांबरुंद पसरलेली एक सात मजली इमारत दिसली. हें पिनांगचें हॉस्पिटल. एका इमारतीवर 'पिनांग बुद्धिस्ट असोसिएशन टेंपल' हें नांव वाचून आम्ही आंत गेलों. एखाद्या वाचनालयाची किंवा सभागृहाची इमारत असावी तशी ती लांबूनही दिसते. आवाराच्या आंत मोटारी उभ्या होत्या. प्रवेश दारासमोर आपल्या देवळांच्या दीपमाळेसारखा एक मनोरा होता आणि त्यावर, हिरवे, पिवळे, लाल विजेचे दिवे पेटत होते. तिथेंच एक मोठ्या थोरल्या नक्षीदार पितळेच्या भांड्यांत जाडजाड चंदनी उदबत्त्या जळत होत्या. आंत गेल्यावर मुंबईं कावसजी जहांगिर हॉलसारख्या भव्य सभागृहांत गेल्यासारखें वाटलें. प्रवेशद्वाराच्या डाव्या बाजूला एक खोली होती. तिच्यावर 'लेडीज्' अशी पाटी होती. सफेत कपडे घातलेल्या चिनी स्त्रिया आंत बसलेल्या दिसल्या. उजव्या बाजूच्या खोलीवर 'जेन्ट्स्' अशी पाटी होती. आंत स्वच्छ सफेत कपड्यांतले चिनी पुरुष वाचीत किंवा बोलत बसले होते.

मंदिराच्या स्वच्छ लाद्यांवर मोठमोठीं गुलाबी कमळें आणि कमळाच्या कळ्या याच्या आकृति होत्या. चारी बाजूंच्या भिंतीवर बुद्धाच्या जीवनांतल्या निरनिराळ्या प्रसंगावरचीं ग्रीक चेहऱ्यामोहऱ्याचीं रंगीत चित्रें रांगेनें लावलेलीं होतीं. मंदिराच्या मध्यभागीं एक नक्षीकाम केलेला भव्य चौथरा आहे आणि त्यावर, उभा असलेल्या बुद्धाची पांढरी शुभ्र प्रचंड मूर्ति आहे. या मूर्तीच्या दोन बाजूला दोन अशा दुसऱ्या मूर्ती आहेत. त्या बुद्ध-शिष्यांच्या असाव्या. या बुद्धमूर्तीच्या मागें त्याच चौथऱ्यावर बसलेल्या बुद्धाची भव्य मूर्ति आहे. मूर्तीसमोर जमिनीवर रांगेनें छोट्या छोट्या चटया किंवा रंगीत कापडाच्या उशा टाकलेल्या दिसल्या. कांहीं चटयांवर जपमाळ घेऊन जप करीत बसलेल्या चिनी स्त्रिया दिसल्या तर कांहीं वर पुस्तक हातांत घेऊन मंत्रपठण करीत बसलेल्या स्त्रिया होत्या. बाहेर दीपमाळेसमोर किंवा आंत बुद्धमूर्तीसमोर गुडघे टेकून चंदनाच्या उदबत्त्या ओवाळणाऱ्या किंवा तांबड्या रंगाच्या मेणबत्त्या पेटवून मूर्तीसमोर ठेवणाऱ्या बऱ्याच चिनी स्त्रिया दिसल्या. इकडे तिकडे पहात आम्हीं आंत फिरत असतां एक किडकिडीत, गालफडें बसलेला चिनी माणूस आमच्या जवळ येऊन मोठ्या आस्थेनें मंदिराची माहिती अडखळत्या इंग्रजींत सांगूं लागला. [अपूर्ण]



अनुक्रमणिका








केव्हां केव्हां माणसाच्या आयुष्यांत असे प्रसंग घडतात कीं, त्या छोट्या प्रसंगानें त्याच्या साऱ्या आयुष्याला कलाटणी मिळते. थोर व्यक्तींच्या चरित्रांतील असले हे प्रसंग नेहमींच मनोरंजक आणि उद्बोधक असतात. त्यामुळें या सदरांत दर अंकीं आम्हीं आपल्याला निरनिराळ्या व्यक्तींच्या आयुष्यांतील अशा वरून दिसायला क्षुद्र पण अत्यंत महत्त्वाचे असे प्रसंग मुद्दाम वेंचून काढून सादर करणार आहोंत. दीपावलीच्या वाचकांच्या वाचनांत कुठेंहि अशातऱ्हेचे प्रसंग आल्यास त्यांनीं ते आमच्याकडे अवश्य पाठवावे. त्याला आम्हीं या सदरांत योग्य ती प्रसिद्धि देऊ.

# तिथें घडला ग्रंथ

- ❁ डॉ. सी. व्ही. रमण
- ❁ हरमन हेस
- ❁ अर्नेस्ट हेमिंग्वे
- ❁ डॉ. हो चि मिन्ह



लहानपणापासून मी कोणतंही काम उत्साहानें सुरू करीत असें. पण लौकरच मला त्याचा कंटाळा येई, व मी तें काम अर्धवटच सोडीत असें. मी हा असा आरंभशूर होतों त्यावेळीं.

उन्हाळ्याच्या दिवसांत एक दिवशीं पुस्तक वाचतां वाचतां माझ्या वडिलांनीं मला बोलावलं व सांगितलं " मी तुला आतां एक गंमत दाखवितों. " मी लगेच वडिलांकडे जाऊन बसलों. तेव्हां ते म्हणाले " पहा " आणि ते पुस्तकावर एक बिलोरी कांच फिरवीत राहिले. मला त्यांत कुठेंच ' मजा ' दिसे ना. पुष्कळ वेळ पाहिलं मी. पण माझी निराशा झाली. " कुठें काय आहे ? " मी निराश होऊन विचारलं. तेव्हां हंसत हंसत वडील म्हणाले " आतां पहा. " आणि पुस्तकावर एके ठिकाणीं ती बिलोरी काच त्यानीं स्थिर धरली, खिडकींतून येणारे सूर्यकिरण त्या काचेवर पडले होते. आणि हांहां म्हणतां त्या पुस्तकाला एक छोटसं भोंक पडलं. त्या कांचेतून पडणारे सूर्यकिरण पुस्तकावर एके ठिकाणीं केंद्रीत झाले होते. हें सारं पाहून मला आश्चर्य वाटलं. वडिलांनीं मला हें सारं समजावून सांगितलं व म्हणाले " अशा तऱ्हेनें एके ठिकाणीं मन केंद्रीत करून जर काम केलं तर तें यशस्वी होतं. इकडे तिकडे भटकून, अर्धवट लक्ष देऊन काम होत नाहीं. "

त्या बिलोरी काचेचा हा गुरुमंत्र मी विसरलों नाहीं. आयुष्यभर त्याचा उपदेश मी आचरणांत आणीत आहें. आणि म्हणूनच मी आज इथें आहें. "

**डॉ. सी. व्ही. रमण**

• •

त्यावेळीं मी दहा वर्षांचा होतों. आमच्या घरचीं सारीं माणसं ईश्वरभक्त होतीं. जुन्या मताचीं होतीं.



दररोजचे प्रार्थना-दिकांचे कार्यक्रम आमच्या घरीं नियमितपणें पाळले जात. ईश्वरोपासना – पूजा-अर्चा सारं सारं कांहीं यथासांग होई...पण सभोंवारच्या ह्या वातावरणाचा माझ्यावर कांहीं परिणाम झाला नाहीं. माझा ईश्वरावर–पूजेअर्चेवर विश्वास नव्हता. माझं मन त्या साऱ्या अवडंबरावर आकसून उठे. त्याविरुद्ध बंड करीं. आपण जें जें चांगलं करतों त्याचा करता-करविता परमेश्वर आणि जें कांहीं वाईट करतों त्याचं कर्तृत्व फक्त आपणाकडे ! खासा न्याय ! !

मला हें पटत नव्हतं. एकतर भलंबुरं जें जें कांहीं आपण करतों त्याचं कर्तृत्व सारंच्या सारं ईश्वराकडे द्या अगर माणसाकडे तरी द्या. पण ही फाळणी नको. ही मनाला पटत नाहीं–बुद्धीला रुचत नाहीं. माझे हे विचार आमच्या घरच्या मंडळीपुढें मी एक दोनदां मांडले. पण छडीशिवाय दुसरं उत्तर कांहीं मला मिळालं नाहीं. साहजिकच माझं मन ईश्वराच्या आणखी विरुद्ध गेले.

एके दिवशीं वडिलांकडे त्यांचे एक स्नेही आले होते. गोष्टी बोलतां बोलतां माझ्यावर त्यांचं बोलणं निघालं. तेव्हां वडिलांनी मी नास्तिक असल्याचं त्यांना सांगितलं. वडिलांचे ते मित्र शांतपणानें माझी सारी हकीगत ऐकत होते. पण त्यांच्या तोंडावर रोषाचं चिन्हहि नव्हतं. उलट सर्व हकीगत संपल्यावर त्यानीं प्रेमानें मला जवळ बोलावलं व म्हटलं " बाळ तुझं म्हणणं खरंच योग्य आहे. आपण बरंवाईट जें कांहीं करतों त्याचं कर्तृत्व खरोखरीच ईश्वराकडे आहे. पण बाळ हें ' बरं ' आणि ' वाईट ' काय तें तरी सांगशील कीं नाहीं ?

ज्याला मन बरं म्हणतं तें बरं व ज्याला मन वाईटं म्हणतं तें वाईट. खरं ना ? "

मी मान हालविली. तेव्हां ते हंसले. मग म्हणाले, " आतां यापुढें तुझं मन जें जें कांहीं सांगेल तें ऐकत जा. पूजा अर्चा कर अगर नको करूंस. ईश्वरावर विश्वास ठेव अगर नको ठेवूंस. पण मनाचे सारे हुकूम पाळ. तूं जर मनाला जाणूं शकलास तर तूं ईश्वराला ओळखलंस असं समज. कारण मन म्हणजेच भगवान. "



अनुक्रमणिका








आज माझ्या वडिलांचे ते मित्र इथं नाहींत. कुठं आहेत कोण जाणे ! पण त्यांचे ते अमृतमधुर शब्द माझ्या कानांत गुंजारव करीत आहेत. ध्रुवताऱ्याप्रमाणें ते शब्द मला माझा मार्ग स्पष्ट करीत आहेत—आज सुद्धां.

**— हरमन हेस**

( नोबेल पारितोषिक पुरस्कारीत जर्मन लेखक )

• •



त्यावेळीं मी किती वर्षांचा होतो कोण जाणे ! पण त्यावेळीं मी शाळेंत शिकत होतों. आमच्या गुरुजींनीं आम्हांला एक लघुकथा लिहावयास सांगितली. लघुकथा लिहिण्यासाठीं पुरा एक महिन्याचा अवधि दिला होता. ज्याची लघुकथा सर्वांत उत्तम ठरेल त्याला सुवर्णपदक देण्यांत येणार होतं. आमच्या शाळेंमध्यें मी हुषार म्हणून गणलों गेलों होतों व साहजिकच पहिलं बक्षिस मला मिळणार या विषयीं माझ्याप्रमाणें इतरानांही खात्री होती. पण जें काम दोन दिवसांत होण्यासारखं होतं त्याला आमच्या गुरुजींनीं एक महिन्याचा अवधी कां दिला होता तेंच मला कळेना !

पहिले अठ्ठावीस दिवस मी टिवल्याबावल्या करीत घालविले व शेवटच्या दोन दिवसांत लघुकथा लिहीली.

निकालाच्या दिवशीं मी आनंदानें शाळेंत गेलों. माझं बक्षिस निश्चित ही माझी भावना होती. पण जेव्हां मी निकाल ऐकला तेव्हां मी गार झालों. माझा उत्साह भंग झाला. माझा स्वतःवरील विश्वास उडाला. बक्षिस मला न मिळतां दुसऱ्या एकास मिळालं.

मी घरीं आलों आणि कुणाशीं न बोलतां माझ्या खोलींत जाऊन फुरंगटून बसलों.

माझ्या मोठ्या बहिणीनें हें पाहिलं असावं; कारण माझ्या मागोमाग ती खोलींत आली व म्हणाली, " बक्षिस तुला मिळालं नाहीं म्हणूनच रुसलास वाटतं ? " अद्यापपर्यंत कसंबसं आवरून धरलेलं रडं, वडील बहिणीचे वरील शब्द ऐकतांच उफाळून वर आलं आणि मीं ओक्साबोक्शीं रडूं लागलों. तेव्हां ती जवळ आली व ममतेनें माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली, " अरे हें मला अगोदर माहित होतं. गुरुजींनीं महिन्याभरांत करावयास सांगितलेलं काम तूं दोन दिवसांत करावयास पहाशील तर तें कसं होईल ? तुझी ही नेहमींचीच पद्धत आहे. शेवटच्या क्षणीं धांवाधांव करून कधीं कामं होतात का ?...आणि आतां रडून काय होणार आहे ?...तुला जर खरोखरीच वाईट वाटत असेल तर रडत न बसतां हा पराजय म्हणजे तुझ्या उत्कर्षाची पहिली पायरी समज व यापुढें कोणतंहि काम करतांना त्यासाठीं कराव्या लागणाऱ्या श्रमाचं महत्त्व कमी समजूं नकोस. "

माझ्या बहिणीचा हा उपदेश मी शिरसावंद्य मानला व त्याप्रमाणें पुढें आचरण ठेवलं —अगदीं आजतागायत. त्यामुळें मी यशस्वी झालों कीं नाहीं हें ठरविण्याचं काम माझं नव्हे. पण या उपदेशाप्रमाणें शेवटच्या क्षणापर्यंत चालायचा माझा निर्धार आहे.

**—अर्नेस्ट हेमिंग्वे**

(नोबेल पारितोषिक विजेता अमेरिकन लेखक.)

• •



तिथें बदलला सांधा !

त्यावेळीं मी नऊ वर्षांचा होतों. शालेय परिक्षेंत नापास झाल्यामुळें माझं मानसिक



स्वास्थ्य पार बिघडून गेलं होतं. चारचौघांत मिसळण्याचं मी बंद केलं होतं. घरीं किंवा रानांत जाऊन मी एकटाच बसत असें. खाण्यापिण्याची मला शुद्ध नव्हती अगर भावी आयुष्याविषयीं फिकीर नव्हती. साहजिकच माझं मन आणखी अस्वस्थ झालं. निराशा आणि निष्क्रीयता यांच्यामुळें नकोनको ते विचार मनामधें येऊं लागले. आणि आत्महत्या करण्यापर्यंत मनाची मजल गेली.

माझी ही स्थिति पाहून वडिलांनीं माझी समजूत करण्याचा प्रयत्न केला. आईनें डोळ्यांत अश्रु आणून विनवणी केली आणि आमच्या धर्मगुरुनीं पण आपल्यापरी सांगीतलं. पण या साऱ्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. रात्रीच्या रात्री मी जागून काढल्या, झोपेचा लेशही नाहीं. भयप्रद असे विचार मनांत येत आणि माझी कुतर ओढ करीत. एके रात्रीं झोप येईना म्हणून बिछान्यावरून उठलों व घराबाहेर गेलों व पुढें पुढें चालूं लागलों. चालतां चालतां वाटेमध्यें एका बौद्ध साधूचे मधुर गायनाचे स्वर कानीं पडले, साहजिकच मी त्याच्याजवळ गेलों, तेव्हां कळलं कीं तो बौद्धकवि स्वतःच्याच कविता गात होता.

**त्याच्या कवितेचा अर्थ—**

पाणी अस्वच्छ कां होत नाहीं ?
—कारण तें सारखं वहात असतं.
पाणी नासत कां नाहीं ?
—कारण तें सारखं वहात असतं.

[ पान ५८ वर पहा ]




अनंताच्या अवकाशांतील 'वात' मापन गृह

# मानवाचा चंद्रासाठीं हट्ट

प्रा. ना. वा. कोगेकर

शास्त्रज्ञांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेला व अमर्याद बुद्धिसामर्थ्याला जणूंकांहीं पृथ्वीचे संकुचित क्षेत्र अपुरें पडूं लागल्यामुळें, विश्वांतील अन्य ग्रहगोलांकडे त्यांनीं आपली दृष्टि वळवलेली दिसते. पृथ्वीखेरीज इतर ग्रहांवर पाऊल ठेवण्याची तयारी त्यांनीं मोठ्या झपाट्यानें चालवलेली दिसते. ४ आक्टोबर १९५७ हा दिवस आंतर्ग्रह प्रवासाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिला जाईल. या दिवशीं रशियानें पहिला कृत्रिम उपग्रह पृथ्वीभोंवतीं फिरत ठेवला. त्यानंतर ३ नोव्हेंबर रोजीं दुसरा कृत्रिम उपग्रह पृथ्वीवरून सुटला. दुसरा उपग्रह पहिल्या सवाई वजनानें पहिल्यापेक्षां भारी व भ्रमण करीत असलेली पृथ्वीपासूनची उंचीहि जाती. आणखी थोडा काल लोटला. ३१ जानेवारी १९५८ हा दिवस उजाडला आणि या खेपेला अमेरिकेनें 'एक्सप्लोरर्' या नांवाचा एक छोटेखानी उपग्रह आकाशांत ठेवला. आतां यानंतर आली रशियाची पाळी. अखेर १५ मे १९५८ या दिवशीं रशियानें तिसरा स्पुटनिक आकाशांत भिरकावला. तिसरा स्पुटनिक म्हणजे सर्वांचा जणूं मुकुटमणीच. जसा वजनानें सर्वांत भारी तशी त्यानें गांठलेली उंचीही जास्ती. पृथ्वीभोंवती गस्त घालीत राहणारे उपग्रह सोडण्याची जणूं स्पर्धाच रशिआ-अमेरिका यामध्यें लागली. या स्पर्धेमध्यें कोण जिंकतो, कोण हरतो अशी चुरस लागलेली ! आणि हे सर्व कां म्हणून ? जगाच्या माथ्यावर चढून पृथ्वीवर करडी नजर व हुकमत गाजविण्यासाठींच तर ही चुरस लागलेली नसेल ना ? कां इतरांच्या आधीं चंद्रावर जाऊन प्रथम पाऊल रोवण्यासाठीं चालली आहे ही धडपड ? पण पृथ्वी-चंद्र किंवा पृथ्वी-मंगळ प्रवास म्हणजे मुंबई–पुणें असा कां प्रवास आहे ? पृथ्वी–चंद्र म्हणजे केवढे हें २ लक्ष ४० हजार मैलाचें अवाढव्य अंतर ! किती लांबचा हा प्रवास ! वाटेंत किती अडचणी, अडथळे ! बरें, या सर्वांना तोंड देत देत जीव मुठींत धरून अखेर कसें बसें चंद्रावर पाऊल ठेवलें एकदाचें, तरी देखील "दुरुन डोंगर साजरे" असेंच म्हणायची पाळी या प्रवाशावर यावयाची. कारण काय ? अहो चंद्रावर नाहीं वातावरण, तेथें नाहीं अन्नपाणी. तेथें फुकटची हवा देखील खावयाला मिळावयाची नाहीं. होरपळून टाकेल एवढी उष्णता दिवसा चंद्रावर असलेली आपल्याला अनुभवयास मिळेल तर उलट गोठून टाकेल एवढी कडाक्याची थंडी आपल्याला तेथें रात्री पडत असलेली दिसून येईल. पृथ्वीवरील गामायुगासारखी मजबूत, वजनदार, पहेलवान मंडळी, चंद्रावर फुंकरीसारखी उडून जाणारे काडीपहेलवान ठरावयाचे. चन्द्रावर गेल्यावर प्रवाशाचा तेथील जमिनीवर पाय टरेल म्हणाल तर शपथ ! या सर्वांचे कारण काय तर चन्द्राचे गुरुत्वाकर्षण पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाच्या ⅙ इतकेच. मयसभेंत जशी दुर्योधनाची गत झाली म्हणतात तशीच गत आपणा सर्वांची चंद्रावर व्हावयाची. जमीन पाहून ऐटींत पावले टाकायला जावें तों, मनुष्य वरच्यावर अधांतरी तरंगावयाला लागावयाचा, असा प्रकार. हातापायांची हालचाल म्हणजे सुद्धां, सर्कशींतला तारेवरचा नाचच ! बरें चन्द्रावर बोललेले ऐकूं तरी येईल कां ? छे, चंद्रावर वातावरणच नाहीं मुळीं, मग ध्वनीची वाहतुक कोणाकडून होणार ? तेथें सर्वत्र कशी अगदीं स्मशानवत् शांतता नांदत असणार ! चन्द्रावरील रात्र दोन आठवड्याची व दिवसही दोन आठवड्याचा. चन्द्रावर जमीन अशी नाहींच ! त्याचा पृष्ठभाग म्हणजे सर्वस्वी खडकाळ, खडबडीत. चन्द्रावर पर्वतांची मात्र अगदीं रेलचेल. चन्द्रावर असतांना आकाशाकडे नजर लावलीत तर तें अगदी काळेकुळकुळीत दिसेल. अशा आकाशांत दिसणाऱ्या तारका कांहीं चमचम करताना दिसणार नाहींत. उलट त्या सर्व तारका अगदी स्थिरप्रकाशित असलेल्या दिसतील. वातावरणाचा आभाव हेच या सर्व चमत्काराना कारणीभूत होय. चंद्रावर जेथें अशी भयानक परिस्थिती तेथें इतर ग्रहावर आणखी कोणकोणते चमत्कार व संकटे प्रवाशापुढें वाढून ठेवलेली असणार कोण जाणे ! शुक्र व बुध हे दोन अंतर्ग्रह, सूर्यापासून बरेच जवळ ! साहजीकच तेथील

उष्णतामान फार! तेथे मनुष्याला जिवंत राहणेंच अशक्य. गुरु, शनि, युरेनस् नेपच्यून प्लूटो हे सर्व बहिर्ग्रह. हे सर्व सूर्यापासून खूप अंतरावर, साहजिकच हे सर्व गोठलेल्या थिजलेल्या, गारठलेल्या स्थितींत असणार! असल्या थंडींत कोणता प्राणी जगेल वांचेल बरें? राहता राहिला मंगळ. त्यावरील उष्णतामान त्यामानानें मनुष्याला सहन करवेल एवढेच. कदाचित् एकादी जीवसृष्टी मंगळावर अस्तित्वांत असण्याची शक्यता आहे. अशा बहुविध ग्रहांनीं नटलेल्या या बहुरंगी, बहुढंगी व नाविन्यपूर्ण विश्वात संचार करता यावा म्हणून तर मनुष्याची गेली कांहीं वर्षें धडपड सुरु आहे. कदाचित् तो सुदिन नजिकच्या भविष्यांत उगवेल अशी चिन्हें आतां दिसूं लागली आहेत.

कृत्रिम उपग्रह आकाशांत फिरत ठेवण्यांत रशिआ-अमेरिका या देशांनीं विजय मिळविला खरा परंतु एवढ्यानेंच विश्वसंचाराचे रम्य स्वप्न साकार होणार कसें? इतर ग्रहगोलांवर पाऊल ठेवायचे म्हटलें तर प्रथम पृथ्वीच्या कचाट्यांतून सुटावयास नको का? तिच्या बाहुपाशांतून मोकळे झाले तरच पुढचें पलायन शक्य होणार. पृथ्वीनें स्वतःभोंवती पसरवून ठेवलेले हें जाळें कसलें बरें आहे? अर्थात् गुरुत्वाकर्षणाचेंच. याच गुरुत्वाकर्षण-मुळें तुम्हा आम्हा सर्व पृथ्वीवासियांना जडपणा म्हणजेच वजन प्राप्त होत असतें. आकाशाच्या दिशेनें फेकलेल्या गोळ्याला खेंचून घेऊन स्वतःच्या अंकावर आणून ठेवण्याचें काम पृथ्वीचें गुरुत्वाकर्षणच करीत असतें. तेव्हां पृथ्वीच्या कचाट्यांतून सुटून विश्वांतील इतर ग्रहगोलांवर पाऊल ठेवावयाचें असेल तर आपल्याला पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षण शक्तीला भीक घालून चालावयाचें नाहीं. पण हें कसें शक्य आहे? "जळांत राहून माशांशीं वैर" कोणाला तरी करतां येईल का? एकाद्या वस्तूचा पृथ्वीच्या पृष्ठभागापासून दूर जाण्याचा वेग जर ताशीं २५ हजार मैल म्हणजेच दर सेकंदाला ७ मैल इतका असेल तरच पृथ्वीच्या या गुरुत्वाकर्षणाच्या मगरमि-ठींतून ती वस्तू स्वतःची सुटका करून घेऊं शकेल. रशिया-अमेरिका यांनीं आतांपर्यंत फिरत ठेवलेल्या कृत्रिम उपग्रहांचा भ्रमणवेग ताशीं १८ हजार मैल इतकाच होता. साह-जिकच धन्याभोंवतीं घुटमळत राहणाऱ्या एक-निष्ठ इमानी कुत्र्याप्रमाणें सर्व स्पुटनिक उपग्रह पृथ्वीभोंवतीं घिरट्या घालींत होते यांत नवल तें कसलें? तेव्हां सेकंदाला ७ मैल इतका वेग घेणारे आकाशांतील जहाज़ तयार करण्याच्या उद्योगाला वरील देश धडाडीनें लागले. आणि अखेर चालू वर्षाच्या सुरवा-तीला, म्हणजे २ जानेवारी १९५९ या दिवशीं रशियानें चंद्राच्या दिशेनें एक अग्निबाण (Rocket) सोडून त्याला ताशीं २५ हजार मैल वेग देण्यांत यश मिळविलें; आणि अशा रीतीनें विश्वसंचाराचं एक नवें पर्व वैज्ञानिक क्षेत्रांत सुरू करून दिले. दिनांक ४ जाने-वारीला हा लाल अग्निबाण चंद्रापासून जवळ म्हणजे सुमारें ४६० मैल अंतरापर्यंत जाऊन अखेर ७ जानेवारीला सूर्यमालेंतील एक मानवनिर्मित नवा कृत्रिम ग्रह म्हणून भ्रमण करूं लागला, मानवाच्या बुद्धिसामर्थ्याची साक्ष निसर्गाला पटवून देण्या-साठींच एक नवा ग्रह निर्माण करून खुद्द ग्रहमालिकेंतच फिरत ठेवण्याचें काम रशियानें केलें. पृथ्वी व मंगळ यांच्या भ्रमणकक्षांच्या दरम्यानची कक्षा या कृत्रिम ग्रहानें आपल्या भ्रमणासाठीं स्वीकारली आहे. या कृत्रिम ग्रहाच्या अखेरच्या भागाचें, इंधन विरहित वजन सुमारें ७०० पौंड इतकें होतें. दि. जानेवारीला या कृत्रिम ग्रहामधून धूमकेतूच पांढऱ्या शेपटीसारखी शेपटी किंवा पांढ पट्टा बाहेर फेकला गेला. हा पट्टा म्हण सोडिअम् धातूची वाफ किंवा ढग हो या पांढऱ्या शेपटीचें छायाचित्र, पृथ्वीवरून घेणें शास्त्रज्ञांना शक्य झालें. या पांढ पट्ट्याच्या निरीक्षणावरून अवकाशा (Space) अस्तित्वांत असणाऱ्या वस विषयींचे व तिच्या घनतेविषयींचे ज्ञ मिळूं शकेल; कारण या कृत्रिम प्रका पट्ट्याची प्रखरता व आकार ही दोन्ही जागीं असणाऱ्या वस्तूच्या घनतेवर व वस मानावर अवलंबून असणार हें उघड आं अवकाशांत असणाऱ्या अशा या सर्वव्या वस्तूची माहिती मिळाल्यास भविष्यांत केल जाणाऱ्या आंतर्ग्रह प्रवासाचे मार्ग आंख सोपें होईल.

या कृत्रिम ग्रहांत निरनिराळीं मापन बसविलेलीं आहेत. या मानवयंत्राकडू अवकाशांत सुरूं असणाऱ्या हरतऱ्हेच घडामोडींची वैज्ञानिक माहिती शास्त्रां मिळणार असून, भविष्यांत केल्यां जाणा

[ पान ५७ वर पहा ]



ताशीं २५००० मैलांच्या गतीनं सूर्याकडे धांवणारें रॉकेट!



# घातली ही पाणपोई

*नव्या पिढीचे,*
*नव्या सांप्रदायाचे,*
*आघाडीवरचे*
*कवि आणि कथाकार*

**सदानंद रेगे**

*यांनीं*

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतांत. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनं दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनं ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचे गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल कु. विभावरी नेमाडे, पुणें यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

**प्रश्न—राजकारणांत यशस्वी व्हावयास कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता असते ?**

**उत्तर**—राजकारणांत यशस्वी व्हावयाचें तर खालील गोष्टींची आवश्यकता असते—

(१) गेंड्याची कातडी.
(२) हत्तीची स्मरणशक्ति.
(३) गाढवाची काम करायचीं ताकद.
(४) मांजराचा कोडगेपणा.
(५) सिंहाची छाती.
(६) कोल्ह्याचें चातुर्य.
(७) कांसवाचा धिमेपणा.
(८) पोपटाचा बोलकेपणा.
(९) मुंगीचं मौन. आणि
(१०) सरड्याची रंग बदलण्याची हातोटी.

विचार करा अन् काय तें ठरवा.

**रामभाऊ गो. गोविलकर**

**प्रश्न—ज्योतिषशास्त्र आपणांस काय शिकवितें ?**

**उत्तर**—ज्योतिषशास्त्रावर विश्वास ठेवूं नका हें.

**उपेन्द्र जगदाळे**

**प्रश्न—पु. शि. रेगे हे महाकाव्य लिहूं शकतील काय ?**

**उत्तर**—पु. भा. भावे हे किंचित्काव्य लिहूं शकतील काय ?

**द. वा. घाटपांडे**, सातारा

**प्रश्न—शास्त्रीय उपकरणांनीं सज्ज असलेल्या वेधशाळांपेक्षां साध्यासुध्या खेडुत शेतकऱ्यांचे हवामानासंबंधीचे अंदाज पुष्कळदां अचूक ठरतात हें कसें ?**

**उत्तर**—वेधशाळांचे अंदाज हटकून चुकतात हें खेडुत शेतकऱ्यांना ठाऊक असतें म्हणून.

**वनाजीराव शामराव खुरंदळ**

**प्रश्न—आमच्या गांवांत एक म्हातारा धनगर आहे. मेंढ्यांच्या कळपाकडे नुसता दृष्टिक्षेप करून, तो त्या कळपांत किती मेंढरें आहेत हें सांगूं शकतो. हें त्याला कसें काय जमत असावें ?**

**उत्तर**—कळपाकडे पहतां पहतां तो प्रत्येक पाय मोजीत असावा. आलेल्या आंकड्याला चारानें भागलें कीं मेंढ्यांची संख्या मिळाली. आहे काय नि नाहीं काय ?

**गजानन पां. शेलार**, आंबेजोगाई.

**प्रश्न—यंदा चांगला पाऊस पडला नाहीं तर आपल्या राष्ट्राचें कसें होणार ?**

**उत्तर**—पाऊस पडूनहि आपलें राष्ट्र काय दिवे लावीत असतें ? कांहीं काळजी करूं नका. जोपर्यंत आपल्या राष्ट्रांत झोळ्यांचा तुटवडा पडत नाहीं, तोपर्यंत विवंचना करण्याचें कारण नाहीं. फार फार तर एवढेंच होईल कीं, शाळांना सुट्या कमी मिळतील व कारकुनांना दांड्या मारायला वेगळीं कारणें शोधून काढावीं लागतील !

**मधुकर वालावलकर**, पुणें

**प्रश्न—तुम्हीं शतायुषी झालांत तर काय कराल ?**

**उत्तर**—तशी लेखी गॅरंटी मला मिळत असेल तर मी दोन गोष्टी करीन. (१) यापुढें विम्याचे हप्ते भरणार नाहीं, व (२) एखादी पेन्शनेबल सरकारी नोकरी मिळविण्याच्या खटपटीला लागेन.

**ललित कुळकर्णी**, वलसाड

**प्रश्न—मंगळावर जाणारा पहिला माणूस कोण असेल ?**

**उत्तर**—एखादा मद्रासी टायपीस्ट.

**रघुनाथ वि. कामत**, बडोदें

**प्रश्न—स्त्री ही जात्याच काटकसरी असते असें मला वाटतें. तुमचे काय मत आहे ?**

**उत्तर**—एखाद्या स्त्रीबरोबर तुम्हीं कापडाच्या किंवा सराफाच्या दुकानात गेलेले दिसत नाहीं ! तसें असतं तर स्त्रीजातीविषयीं तुमचा हा गैरसमज झाला नसता.

**वि. आ. गजेंद्रगडकर**, सदाशिवगड.

**प्रश्न—दर महिन्याचा पगार बायकोजवळ देणें चांगलें कीं वाईट ?**

**उत्तर**—चांगलें. कारण त्यामुळें पगारापाठोपाठ येणारी प्रचंड डोकेदुखीहि आपोआपच तिच्याकडे जाते. विचारी !....

**मालती शं. गोडघाटे**

**प्रश्न—'तो दोन पैसे वाळगून आहे.' हा वाक्प्रचार आतां 'तो दोन नये पैसे वाळगून आहे' असा बदलून घ्यावयास नको काय ?**

**उत्तर**—बदलून घ्यावयास हवा, पण 'तो तीन नये पैसे वाळगून आहे' असा.

**परशुराम सांवापूरकर**

**प्रश्न—अलिकडे मला अजिबात झोंप लागत नाहीं. काय करूं ?**

**उत्तर**—लग्न करा. व लग्न झालें असल्यास घटस्फोट घ्या.

**सौ. मा. व. दे.** नागपूर

**प्रश्न—माझे यजमान अलिकडे प्रकृतीनें फारफार क्षीण झाले आहेत. कित्ती औषधें केलीं पण मेला कांहीं गुणच नाहीं. अशा स्थितींत मी करूं तरी काय ?**

**उत्तर**—तुम्हीं एक दोन वर्षे माहेरीं जा.

**कु. सुलोचना पं. पंडित,** पोफळी.

**प्रश्न—एखाद्या मराठी साहित्यीकाला नोबेल प्राईझ मिळालें तर काय होईल !**

**उत्तर**—प्रत्येक कथेला तो पंचविसांऐवजी सव्वीस रुपये मागूं लागेल व कवीच असला तर प्रत्येक कवितेला पांचाऐवजीं साडेपांच रुपये.

**शं. पां दाते**

**प्रश्न—जगांत सर्वांत उत्तम दारू कुठें मिळते ?**

**उत्तर**—मुंबईत राहून तुम्हीं हा प्रश्न विचारावा याचें आश्चर्य वाटतें !

**मधु व्यवहारे**

**प्रश्न—तुमच्या बँकेंतली शिल्लक किती आहे ?**

**उत्तर**—शून्य. बँकेंत जाऊन पैसे भरायला इथं कुणाला एवढा वेळ आहे ?

**वि. ज्ञा. नलावडे,** कोल्हापूर.

**प्रश्न—विमा एजंटाची ब्याद कशी काय टाळावी ?**

**उत्तर**—घराला कमींत कमी दोन दारें करून घ्यावींत व प्रत्येक दारावर एक बंदूकधारी शिपाई ठेवावा.

**काशीनाथ गंगाराम पानसरे,** सांगली.

**प्रश्न—माझ्या एका मित्राला नुकताच पांचशें रुपयांचा बोनस मिळाला आहे. अडिअडचणीला उपयोगी पडावी म्हणून त्याला ही रक्कम बँकेंत टाकावयाची आहे. तर याच्या उलट त्याच्या बायकोला तेवढ्या रकमेचें फर्निचर घेऊन टाकावयाचें आहे. अशा परिस्तींत त्यानें कसा मार्ग काढावा ?**

**उत्तर**—तुमच्या त्या मित्राला असें सांगा कीं, ते पांचशें रुपये घेऊन सरळ बाजारांत जा व ज्या दुकानांस 'सेल' लागला असेल अशा एखाद्या दुकानांत जाऊन एक हजार रुपये किंमतीचें फर्निचर पांचशें रुपयांना घेऊन ये. असें केल्यानें दोघांचेंहि समाधान होईल. हजार रुपयांचा माल पांचशाला मिळाल्यानें तुमच्या मित्राचे पांचशें रुपये शिल्लकींत पडल्यासारखें होतील व घरांत तेवढ्याच किंमतीचें फर्निचरहि येईल.

**ज्ञानेश्वर कुळकर्णी,** बडनेर.

**प्रश्न—'सिनिक कोणाला म्हणतात !**

**उत्तर**—'तूं अस्तित्वांत नाहींस' असें, त्याच्या तोंडावर ईश्वराला सांगणाराला.

**पुरुषोत्तम घ. म्हात्रे,** ठाणें.

**प्रश्न—सर्वांत सुखी कुणाला समजावें ?**

**उत्तर**—ज्याची बायको मुकी असते त्याला—किंवा ज्याच्या बायकोला बड्बाळ समजत नाहीं त्याला.

**प्रश्न—सर्वांत दुःखी कुणाला समजावें ?**

**उत्तर**—'कांदा भजी खाऊं नका' असें डॉक्टरांनीं बजावलें असतें त्याला.

**भास्कर वामन पारगांवकर**

**प्रश्न—मुंबईतील घरांच प्रश्न कसा सुटणार ?**

**उत्तर**—जेव्हां इतकी महागाई वाढेल कीं, घराचें भाडें देणेंहि लोकांना शक्य होणार नाहीं तेव्हां. मग भराभर घरें रिकामी होऊं लागतील. घरें रिकामी होऊं लागलीं कीं नाइलाजास्तव मालकांना त्यांचीं भाडीं उतरावीं लागतील. मग काय—मुंबईत घरेंच घरें ! आव जाव घर तुम्हारा...

**राजा दामले,** दादर

**प्रश्न—हें सर्व प्रश्न खरोखरच तुम्ही वाचकांकडून आलेल्या प्रश्नांतून निवडले आहांत काय ?**

**उत्तर**—तुमचा हाहि प्रश्न मींच तयार केला आहे असें तर तुम्हांला वाटत नाहीं ?

—०—

पु. भा. भावे हे अकस्मात बाहेरगांवं गेल्यामुळें ह्या महिन्यांत पाणपोई चालूं शकल नाहींत. पुढील पाणपोई अर्थात् ते चालणार आहेत.

[ पान ५८ वरून चालू ]

आलेली गुद्दागुद्दी यामुळें सर्वसामान्य जनतेच्या मनांत समितीच्या भावी यशाबाबत साशंक निर्माण झाली आहे. आचार्य अत्रे, एस्. एम जोशी आणि दत्ता देशमुख यांचा वृत्तपत्रांत आणि जाहीर व्याख्यानांतून चाललेला व एका परीनें अनिष्ट आहे हें त्या त्या मंडळ तहि मान्य व्हावें. वादांतील हीं पुढारी मंड कर्तृत्वशाली आणि बुद्धिमान् आहे आ यांच्या नेतृत्वामुळेंच गेल्या निवडणुक समितीला भरघोस यश लाभलें ही गोष्ट नाक रतां येण्यासारखी नाहीं. आणि त्यामुळेंच व्यक्तींचा सार्वजनिक वाद शक्य तितक लवकर मिटावा असें सर्वांना वाटणें साहजि कच आहे. द्विभाषिक मुंबई राज्य आतां रु आहे, अशी काँग्रेस नेत्यांची ग्वाही, सी प्रदेशाबाबत श्रेष्ठींची उदासीन वृत्ति या घटना लक्षांत घेतां समितीच्या राजकारणांत ही फाटाफूट एका परीनें संयुक्त महाराष्ट्राच निर्मितींत अनिष्ट अशीच असल्यामुळें हे पुढाऱ्यांतील क्षणिक बेबनाव सत्वर दूर होऊ या सर्व पुढाऱ्यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या ज निर्मितीसाठीं पुनरपि एकजूटीनें खांद्या खांदा लावून लढणें अगत्याचें आहे आ तशीच आम मराठी जनतेची इच्छा आहे.

वाचकांच्या आग्रहावरून जुलै ऐवजी ऑगस्टचा **दीपावलीचा** अंक हा 'अभिनव महाराष्ट्र विशेषांक' म्हणून प्रसिद्ध होईल. सविस्तर माहिती पुढील अंकी.




❀ प्रा. क्षीरसागरांचें भाषण

❀ पत्रकार संमेलन ❀ कांहीं कलाप्रदर्शनें

❀ सुस्वागतम् ❀ राजकीय दुही

## साहित्य

### प्रा. क्षीरसागरांचें भाषण

मिरज येथें कै. वासुदेवशास्त्री खरे मंडपांत भरलेल्या ४१ व्या मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून महाराष्ट्राचे नामवंत समीक्षक प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत मराठी लेखकांना उच्च भावना आणि श्रेष्ठ ध्येयवाद जागृत ठेवण्याचा आदेश दिला. प्रा. क्षीरसागरांच्या या भाषणांत त्यांनीं भाषिक राज्य, साहित्यिक आणि भाषिक लढा, परभाषांचें आक्रमण, वाङ्मयांत माजलेलें विशिष्ट संप्रदायांचें स्तोम, मराठी भाषेचें भवितव्य, इत्यादि विविध विषयांवर आणि विचारप्रवादावर मार्मिक आणि मनमोकळें मतप्रदर्शन केलें आहे. मराठी वाङ्मयांत आज वरचढपणा मिरवित असलेल्या एका प्रवृत्तीबाबत बोलतांना ते म्हणाले, " आजच्या युगांतील एक वाङ्मयीन संप्रदाय 'मायेशिवाय रड नाहीं' ही म्हण खोटी पाडून दाखवीत आहे. कशावरहि प्रेम नसतां नैराश्याची गीतें गाणें, कुठल्याच उच्च आदर्शांची ओढ नसतां जुने आदर्श ओढून काढणें, सौन्दर्याची प्रेरणा नसतांच काव्यनिर्मितीला प्रवृत्त होणें हें आजच्या एका वाङ्मयीन संप्रदायाचें खास लक्षण आहे. या संप्रदायांत 'सौन्दर्याचा अभाव' आहे असें नव्हे तर सौन्दर्याच्या आकांक्षेचाच अभाव आहे. जुगूप्सा ही या संप्रदायाची प्रेरणा आहे! तर औचित्यभंग हे त्याचें सवंग आणि ग्राम्य असें तंत्र आहे."

प्रा. क्षीरसागरांनीं आपल्या भाषणांत नव-वाङ्मयावर कठोर प्रहार केले आहेत. मराठी वाङ्मयांतील नव्या नव्या प्रयोगांबाबत ते म्हणतात, " अनुभवाशीं तादात्म्य पावण्या-ऐवजीं त्याचें विश्लेषण करण्यानें—आणि तेंहि एखाद्या पुस्तकी सिद्धांतानुसार करण्यानें, जीवनाचा गाभा हातीं लागेल ही आजच्या नवसांप्रदायाची कल्पना आहे. आणि वाचकांचें हृदय आकर्षकतेनें काबिज करण्या-ऐवजीं विपरीततेनें प्रक्षुब्ध करणें हें अभिव्यक्तीच्या नावीन्यामागचें सूत्र आहे. प्रेम, आवड, आनंद, आणि तन्मूलक तादात्म्य यांत कलाकृतीचा उगम आहे, केवळ नावीन्य व प्रयोग एवढ्यानें कला निर्माण होत नसून नावीन्याबरोबरच सौंदर्याचीहि निर्मिती व्हायला हवी या गोष्टीचा आज विसर पडत आहे."

प्रा. क्षीरसागरांची नववाङ्मयावरील आणि नव्या वाङ्मयीन प्रयोगांवरील ही टीका सार्थ असली तरी त्या टीकेंत नाविन्य नाहीं. गत-वर्षीच्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून कवि अनिल यांनीं असेच प्रहार नववाङ्मयावर निराळ्या भाषेंत केले होते. या अनिलांच्या भाषणांतील टीकेंत जो अपूरेपणा तोच अपूरेपणा प्रा. क्षीरसागर यांच्या भाषणांत आढळतो. आजच्या नववाङ्मयांत 'सौंदर्याच्या आकांक्षेचा अभाव आहे' या विधानाला त्यांनीं पुष्टिदायक अशी उदाहरणें दिलीं असतीं तर बरें झालें असतें. 'नाविन्य आणि प्रयोग' यांनीं कला निर्माण होत नाहीं असें एक अत्यंत ढोबळ विधान प्रा. क्षीरसागरांनीं केलें आहे. मान्यता पावलेल्या (आणि सरकारी पुरस्कार मिळालेल्या) अशा ग्रंथांत अशा कोणत्या वाङ्मयप्रकारांत हे दुर्गुण आढळतात, 'जुगूप्सा' ही कोणत्या काव्यांत वा कथेंत प्रेरणारूपानें आढळते याचें विवेचन करण्याचें धाडस त्यांनीं या भाषणांत दाखवावयास हवें होतें. अर्थात् साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून केल्या जाणाऱ्या भाषणांना विवेचनाच्या मर्यादा असतात हें मान्य आहे, पण अशा भाषणांत पूर्व सूरींचे तेच तेच मुद्दे आणि तीच तीच ठराविक टीका आणि एकसांची आशीर्वादात्मक आशावाद असण्यापेक्षां क्षीरसागरांनीं जुनीं चाकोरी सोडून नव्या पद्धतीनें आपले विचार मांडले असते तर त्यांच्या समीक्षणात्मक वाङ्मयीन प्रकृतीस साजेसें झालें असतें. नाहींतर अशा भाषणांनीं कांहीं अल्पकाळ वादसंवाद होण्यापलीकडे फारसें कांहीं साध्य होत नाहींत असा आतां-पर्यंतचा अनुभव आहे.

### पत्रकार संमेलन

स्वातंत्र्यपूर्व कालांत वृत्तपत्रांची संख्या मर्यादित असली तरी देशाच्या राजकीय जीवनाला वळण लावण्याचें महान् कार्य वृत्तपत्रांनीं केलें. वृत्तपत्रांचे संपादक हे नुसतेच पत्रकार नव्हते तर राजकीय नेतेहि होते. मराठी वृत्तपत्रांची परंपरा यां संदर्भांत तेजस्वी आणि अभिमानास्पद आहे. केसरी-

अनुक्रमणिका

कार टिळक-आगरकर, काळकर्ते परांजपे, नवाकाळचे खाडिलकर हीं माणसें उत्तुंग ध्येयवादानें प्रेरित होऊन या व्यवसायांत पडलीं. त्यांनी या व्यवसायाची महति तर वाढवलीच पण महाराष्ट्राचें सामाजिक, सांस्कृतिक आणि राजकीय नेतृत्वहि केलें यामुळें दरवर्षी साहित्य संमेलना इतकीच पत्रकार संमेलनाला प्रतिष्ठा मिळाली होती.

पण युद्धोत्तर काळांत पत्रव्यवसायाचा दर्जा एका परीनें खालावलाच. ध्येयवाद मागें पडला आणि अर्थवाद पुढें आला. भांडवलदारी गटाचीं वृत्तपत्रें आर्थिक बळाच्या जोरावर ध्येयवादी वृत्तपत्रांना मागें टाकूं शकलीं आणि त्यामुळें वृत्तपत्रें हा धंदा झाला. या धंद्यांत धंदेवाईकांचें प्राबल्य झालें. आणि यामुळें पत्रकार परिषदेचें महात्म्य उरलें नाहीं. गेलीं दोनतीन वर्षें मराठी पत्रकार संघटना यामुळें विस्कळीतच झाली होती. गेल्या महिन्यांत पुण्याच्या कांहीं तरुण आणि उत्साहि पत्रकारांनीं ही कोंडी फोडण्याचा निश्चय करून श्री. पु. दि. ढवळे यांच्या अध्यक्षतेखालीं एक संमेलन भरविलें ही घटना मराठी वृत्तपत्रव्यवसायाच्या दृष्टीनें अत्यंत आशादायक आहे. या परिषदेंत वृत्तपत्रव्यवसायाशीं निगडित असलेल्या कांहीं प्रमुख प्रश्नांवर चर्चा झाली. वास्तविक पाहातां या संमेलनांत जिल्हा आणि तालुका विभागांतील वृत्तपत्रांच्या व्यवसायाबाबत चर्चा होणें आवश्यक होतें. अशा प्रकारची जिल्हा वृत्तपत्रांची संघटना सकाळचे संपादक डॉ. ना. भि. परुळेकर यांच्या नेतृत्वाखालीं दरवर्षी एकत्र येऊन महत्त्वाची चर्चा आणि विचारविनीमय करते. मराठी पत्रकार संमेलन या नव्या संघटनेंत यापुढें पुण्यामुंबईतील वृत्तव्यवसायाच्या अनुरोधानें चर्चा न होतां अशा संमेलनांत मराठी नियतकालिकांचे जें जिल्हावार जाळें आहे या वृत्तपत्रांच्या सद्यस्थितीबाबत आणि ती सुधारण्याबाबत कांहीं उपाययोजना करण्याबाबत कांहीं मार्ग आंखण्याची आवश्यकता आहे. शिवाय अधिकाधिक संख्येनें जिल्हा-पत्रांचे प्रतिनिधि अशा संमेलनाला कसे उपस्थित राहातील याचीहि कांहीं योजना आंखली पाहिजे. नाहींतर ज्यांच्या कल्याणासाठीं अशीं संमेलनें भरवावयाचीं त्यांचीच जर बहुसंख्येनें अनुपस्थिति असेल तर अशा संमेलनांचा एखादा वार्षिक उत्सव या पलीकडे कांहीं किंमत राहाणार नाहीं. —पिनाकी

## सत्यं,शिवं,सुंदरम्

### कांहीं कलाप्रदर्शनें

मुंबईत भरणाऱ्या चित्रकला प्रदर्शनांना, चालू काळांत कुठल्याही तऱ्हेचें गांभीर्य किंवा पोक्तपणा मुळीं देखील राहिला नाहीं; असें विधान केलें, तर तें वाजवीच ठरावें ! जहांगीर आर्ट गॅलरी ही मुक्तपणानें प्रदर्शनें भरवून घेणारी एक चांगली जागा. कुणीहि यावें, कुणीहि जावें, अगदीं निश्चित मनानें ! प्रश्नार्थक सर्वनामापासून भाववाचक नामांचे 'इझम' सर्रास बोकाळून चित्रकलेचें 'तळें' सर्वांना मोकळें झाल्याचे दृश्य इथें पाहावला मिळतें. रंग, रेखा, आकाराच्या पार्श्वभूमीला साधनेचें, तपश्चर्येचें, रचना कौशल्याचें, जिवंतपणाचें आणि लयबद्धतेचें एक तरी उदाहरण पाहून, वर्षभर कोंडलेला निश्वास रसिक जाणकारांनी समाधानानें सोडावा, अशीं उदाहरणें आतां प्रदर्शनांतून दिसत नाहींत. नवीनतेच्या नांवाखालीं हवा तसा धुमाकूळ घालणें हें प्रगतीचें लक्षण असेंच जर नव्यांची कल्पना असेल तर त्यावर आमचें कांहींहि म्हणणें नाहीं.

गेल्या महिन्यांत 'आर्ट सोसायटी ऑफ इंडिया' ह्या संस्थेनें भरविलेल्या प्रदर्शनानें 'आर्ट सोसायटी' या नांवाचा डौलहि कोलमडून टाकलेला आहे. अगदीं सगळ्याच मेंबरांना मुक्तद्वार ठेवून हा जो विचित्र असा नवा पायंडा सोसायटीनें पाडलेला आहे तो सोसायटीच्या हिताच्या दृष्टीनें फायदेशीर असला, तरी जुन्या जाणत्या आणि नव्याचाही 'तसा' हव्यास असणाऱ्या कला साधकांना, हा प्रकार पाहतांना एक भयंकर

---

श्री. शंतनुराव किर्लोस्कर, जनरल मॅनेजर व डायरेक्टर, मे. किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि. पुणें ३ हे आपला अमेरिका व युरोपचा दौरा यशस्वीरित्या पार पाडून, गुरुवार ता. १४-५-५९ रोजीं दुपारीं ३ वा. ५० मि. अलइतालिया विमानानें सांताक्रुझ विमानतळावर उतरले. त्यावेळीं त्यांचे मोठ्या थाटानें स्वागत झालें. त्यावेळी उपस्थित असलेल्या प्रचंड जनसमुदायांपैकीं कांहीं उपस्थित मंडळी. डावीकडून उभेः—



श्री. चन्द्रकांत किर्लोस्कर, सौ. सुमन किर्लोस्कर, श्री. नानासाहेब गुर्जर, श्री. श्रीकान्त किर्लोस्कर, श्री. सूर्यनारायण राव, सौ. यमूताई किर्लोस्कर, श्री. विष्णुपंत कीर्तने, श्री. शंतनुराव किर्लोस्कर, श्री. दामूअण्णा पोतदार, श्री. गणेश तांबे, श्री जयंतराव देवकुळे.

[ पान ९ वरून चालू ]

म्हणतें देवा यमधर्मा ! माझा सत्यवान तूं मला परत दे ! पतिव्रतेच्या प्रार्थनेला तूं यश दे. तुझे सामर्थ्य मी नाकारीत नाहीं, पण प्रेमाचें सामर्थ्य तुला तरी कसें नाकारतां येईल ? पातिव्रत्याचें सामर्थ्य तूं तरी कसें नाकारशील ? उत्कट आणि एकनिष्ठ भावना मृत्यूंजय असतात हेहि जगाला पाहूं दे ! ह्यांतच माझा तरणोपाय आहे ! माझा सत्यवान मला परत दे आणि साऱ्या स्त्री जातीला आशेचे वरदान दे ! अमर निष्ठेचे वरदान दे !

—माझ्या श्वशुराला दृष्टिलाभ ! दृष्टिलाभ आणि पुत्रलाभ ! पुत्रलाभ आणि राज्यलाभ ! प्रणाम ! यमधर्मा–त्रिवार प्रणाम ! ह्या तुझ्या वरदानासाठीं त्रिवार प्रणाम ! पण सावित्रीलं राज्याचा लोभ नाहीं ! वैभवाची तिला अभिलाषा नाहीं ! सत्तेचा तिला मोह नाहीं ! सावित्रीला कांहीं वेगळंच हवं आहे ! ह्या तुझ्या मुलीची केवळ एकच आस आहे. जें मरणास योग्य, ते तूं मारून टाक. पण जे जगावयास योग्य, ते तूंहि जगविलेच पाहिजेस ! विनाशाच्या कुशींतूनहि तूं ते जन्मास घातले पाहिजेस ! सावित्रीला, ह्या तुझ्या मुलीला तूं वैधव्य देशील काय ! प्रेममय श्रद्धा तूं अनाथ करशील काय ? मूर्तिमंत मातृत्व तूं वांझोटे करशील काय ! तर मग मला काय पाहिजे ! कां म्हणून मी ठेचाळत तुझा मागोवा घेत आहे !—मला मातृत्व पाहिजे ! ऐकलेंस मृत्यूच्या महाराजा ! मला जन्मदात्रीचे सिंहासन पाहिजे !– दिलेस ! माझ्या पित्या, माझ्या उपकारकर्त्या, माझ्या रक्षणकर्त्या, दिलेस ! मातृपदाचे वरदान तूं मला दिलेस ?—तुझ्या ह्या अशक्त, कष्टी मुलीचे तुला शतशः प्रणाम !—तर मग तूं मला माझा सत्त्यवानहि दिलास ! स्त्रीजातीला तूं एक नवी आशा दिलीस ! प्रेमाला तूं एक नवे सामर्थ्य दिलेस ! निष्ठेला तूं एक नवे बळ दिलेस ! तपश्चर्येंत तूं एक नवें तेज दिलेस ! तो पहा माझा सत्त्यवान पुन्हा चलनवलन करूं लागला !

ते पहा स्त्रीजातीचे सौभाग्य पुन्हां चलनवलन करूं लागले ! ते पहा मातृजातीचे सुख पुन्हां चलनवलन करूं लागले ! माझा सत्यवान मला मिळाला ! माझा सत्यवान मला मिळाला...

—मी पहात होतो. सत्यवान सावित्रीशीं एकरूप होत होता. निष्ठावंत स्त्रीच्या अलौकिक प्रेमाची अद्‌भुत किमया मी पाहिली होती. निरपेक्ष प्रेमानें भारलेल्या एका अशक्त मुलीच्या अचाट सामर्थ्याचा साक्षात्कार मला झाला होता. सद्‌गुणी सत्यवान सावित्रीच्या प्रेमाचा विषय झाला. वैभवाला मुकलेल्या त्या राजपुत्राचे सद्‌गुण पहाण्यास लागणारी सात्त्विकदृष्टी सावित्रीपाशीं होती. त्या दृष्टीचा परीस सत्यवानावरून फिरला आणि त्याच्या आयुष्याचे सोनें झालें. ज्या क्षणीं त्याला सावित्रीचें प्रेम मिळालें त्या क्षणीं त्याला सारें कांहीं मिळून चुकले. विपत्तीवर मात करील, दुःखावर मात करील, वनवासावर मात करील, प्रत्यक्ष मृत्यूवरहि मात करील असे सावित्रीचे प्रेम होते. असा तिच्या निष्ठेचा व तपश्चर्येचा महिमा होता. नव्हे प्रेमपद व श्रद्धापद अशा स्त्रीत्वाचाच हा महिमा होता. पुण्यपावन स्त्रीत्वाच्या त्या महिम्यानें व्यक्ती उद्धरत होत्या; कुळें उद्धरत होती, वंश उद्धरत होते, देश उद्धरत होते.

...मी सावित्रीकडे पहात होतो. अंतराळांत अद्याप ती तशीच उभी होती. स्थिर, प्रेममय, करुणामय, हास्युमुख ! सावित्रीची ती वंदनीय व कमनीय मूर्ति मला परिचित वाटत होती !—कुठें ? कुठें बरें पाहिलें होतें मी हिला ?––होय–होय ! हे तर गुणवती स्त्रीचें सनातन रूप होतें ! कोमल आणि तरीहि बलाढ्य ! मंद आणि तरीहि तेजस्वी ! अवखळ आणि तरीहि सखोल ! इवलेसें आणि तरीहि उत्तुंग ! मृत्यूला सामोरे जाऊन आणि मृत्यूला पराभूत करून माणसाला जीवनाचें वरदान देणारें !—परम पावन ! परम मंगल ! चिरसुंदर ! चिरतरुण ! सदा वंदनीय !—सावित्री ? सावित्री ?––होय–होय ! ही तर स्त्रीजातींतील उत्तम मोहाची प्रतिनिधिक पुतळी होती ! हा तर स्त्रीत्त्वाचा आत्मा होता, सुभग स्त्रीत्त्वाचे हे सार आणि सत्त्व होते ! सावित्री ! सावित्री !—होय–होय ! सावित्री सावित्री ! सत्यवानाची सावित्री ! स्त्रीत्त्वाची देवता ! मनुष्यतेची माता ! सावित्री !–सावित्री !

—तो प्रचंड वटवृक्ष पुन्हां एकदां पानापानांत सळसळला आणि मग गंभीर ध्वनी उठला–“ बोल ? ही कविकल्पना कीं सत्य ! ”

“ सत्य ! ” मी जयघोष करीत ओरडलो. चिरंतन सत्य ! सनातन सत्य ! सुंदर सत्य ! एकमेव सत्य ! स्त्रीच्या प्रेमाचे सत्य ! स्त्रीच्या त्यागाचे सत्य ! स्त्रीच्या निष्ठेचे सत्य ! स्त्रीच्या सामर्थ्याचे सत्त्य ! स्त्रीच्या सौन्दर्याचे सत्त्य ! स्त्रीच्या उद्धारक शक्तीचे सत्त्य ! स्त्रीच्या मातृत्वाचे सत्त्य ! त्रिवार सत्त्य ! शतवार सत्त्य ! सत्त्य ! सत्त्य ! सत्त्य !

—आणि मी डोळे उघडले. हिरव्या पानांच्या त्या मनोऱ्यांत पिवळा प्रकाश अद्याप रेंगाळत होता. आणि त्या विशाल वटवृक्षाची पानें कसल्या तरी आवेगानें माना डोलावीत होती व दूर दोन चुकार रानपांखरे साद पडसाद घालून म्हणत होती, “ सावित्री–सत्त्यवान ”– “ सत्यवान–सावित्री. ”

• • •

---

दिव्यांतून जात असल्याचा भास झाला. अंधारांत एखादी अंधुकशी ज्योत दिसावी तशी ह्या प्रदर्शनांत एखादी दुसरी चित्रकृति मनोहारी वाटली. विशेषतः तरुणिका दफ्तरी, गाडे, समेळ वगैरे अभ्यासू चित्रकारांच्या चित्रांत ती दिसली, इतकेंच ! बाकी सारी भरती होती !

जर्मन पोस्टरांचें एक गचाळ आणि बनवाबनवीचें प्रदर्शनही बाजूच्या हॉलमध्यें भरलेलें होते. प्रगतीच्या तळ्यांत त्यानींही हात धुवून घेतले होते, असेंच प्रदर्शन पाहून वाटलें !

पुढच्या पंधरवड्यांत गॅलरीच्या दोन हॉलांत मिळून तीन प्रदर्शनें होतीं. कुमारी प्रफुल्ला जोशी, श्री. रझा आणि सरकारी फिल्म डिव्हिजनमध्यें व्यंगपट खात्यांत काम करणारे चित्रकार. ह्यांत ज्ञानानें आणि थोडेसे वयानेंहि प्रौढ होते ते ‘ रझा ’. परंतु ज्या अपेक्षेनें व परदेशीं राहून मिळवलेल्या ज्ञानाच्या पैलूंचे साक्षात्कार ते घडवतील या आशेनें प्रदर्शन पाहिलें ती अपेक्षा मात्र फोल ठरली. रझा पूर्वीच्या तडफेंत तर नाहींतच, पण नवेंही कांहीं दाखवू शकलेले नाहींत, हें थोडेंसें सललेंच.

फिल्म युनीट मधल्या चित्रकारांचें प्रदर्शन थोडेसें बरें वाटलें. त्यांत ‘अशीत सेन’ वेगळ्या वैशिष्ट्यानें चमकलेले दिसले. आर. के. मालवणकर आणि मोनिका नियोगींच्या कृतीही त्यांतल्या त्यांत उठून दिसत होत्या.

तिन्ही प्रदर्शनांत उजवी वाटली प्रफुल्ला

[ पान ५१ वरून चालू ]

आंतर्ग्रह प्रवासासाठीं या माहितीचा फार मोठा उपयोग होणार आहे. अशी कोणती माहिती हा कृत्रिम ग्रह मिळवून देणार आहे बरें ?

आपल्या पृथ्वीप्रमाणें चंद्र व इतर ग्रह यानांदेखील लोहचुंबकीय क्षेत्र आहे किंवा नाहीं याचा उलगडा हा ग्रह करील. चंद्राला जर लोहचुंबकीय क्षेत्र असेल तर त्यावरून चंद्राच्या अन्तरंगाचे ज्ञान आपल्याला होऊं शकेल. पृथ्वीच्या पोटांतील धातुयुक्त गाभ्यामुळें व तिच्या स्वतःभोंवतीं सुरू असणाऱ्या भ्रमणामुळें तिला लोहचुंबकीय क्षेत्र प्राप्त होत असते असें शास्त्रज्ञांचे म्हणणें आहे. तेव्हां चंद्राच्या लोहचुंबकीय क्षेत्रावरून, चंद्राचा गाभादेखील पृथ्वीसारखाच आहे किंवा काय हें ठरविणें शक्य होईल; कारण पृथ्वीच्या भूतकालांतील घडणीचा इतिहास व चंद्राच्या घडणीचा पूर्वेतिहास बराच मिळताजुळता आहे. आपणां सर्वांवर अहोरात्र गुपचुपपणें ज्या किरणांचा वर्षाव होत असतो ते किरण म्हणजे विश्वकिरण ( Cosmic rays ). हें किरण म्हणजे अजूनहि शास्त्रज्ञांना पूर्णपणें न उकललेले एक कोडें होय. पृथ्वीच्या लोहचुंबकीय क्षेत्राच्या अंमलापलीकडील विश्वकिरणांचे मोजमाप, त्यामधील प्रखर व शक्तिमान् अशा घटकांची नोंद, तसेंच चंद्राकडून होणाऱ्या किरणोत्सर्जनाचे मोजमाप, सूर्याकडून अवकाशांत फेकल्या जाणाऱ्या प्रारणांचे ( Radiations ), कणांचे मापन, तसेच उल्काकणांच्या माऱ्याचें मोजमाप इत्यादि आंतरिक्षांतील गूढासंबंधींची शास्त्रीय माहिती हा रशियन ग्रह मिळवून देणार आहे. हा ग्रह वाहून नेणाऱ्या अग्निबाणाच्या अखेरच्या भागाचे प्रवासवृत्त समजावें म्हणून त्यामध्यें शास्त्रज्ञांनीं एक ध्वनिक्षेपण यंत्र बसवून ठेवले होते. या यंत्राकडून येणारे सांकेतिक संदेश पृथ्वीवरील निरनिराळ्या केंद्रांत ग्रहण करण्याची व्यवस्था केलेली होती. त्यावरून अग्निबाणाचा मार्ग व हालचाल यांचे समग्र वृत्त मिळूं शकले. मात्र ध्वनिक्षेपणासाठीं जरूर असणाऱ्या विजेचा सांठा जोपर्यंत अग्निबाणांत होता तोपर्यंतच असे संदेश मिळूं शकत होते.

सूर्याभोंवतीचे एक भ्रमण पूर्ण करण्यास या ग्रहाला ४५० दिवसांचा काल लागेल. त्याची ही भ्रमणकक्षा जवळ जवळ वर्तुळाकार असेल, व तिचा मोठ्यांत मोठा व्यास २०६१६०००० मैल इतका असेल. १४ जानेवारी १९५९ म्हणजे मकरसंक्रांतीचे दिवशीं त्याचे सूर्यापासूनचे अन्तर सर्वांत कमी म्हणजे ८७८४०००० मैल होतें. सप्टेंबर १९५९ च्या सुरवातीला हा ग्रह सूर्यापासून जास्तीत जास्त अंतरावर म्हणजे ११८३२०००० इतका असेल. पृथ्वीवरून सोडलेला हा लालग्रह पुन्हां पृथ्वीच्या अंकावर येऊन पडेल कां ? तशी बरीच शक्यता आहे, त्याची सूर्याभोंवती फिरण्याची भ्रमणकक्षा व पृथ्वीची सूर्याभोंवतीची भ्रमणकक्षा या दोन्ही एकमेकांना, तो ग्रह ज्या बिंदूपासून ग्रहनालेत फिरण्यासाठीं पृथ्वीच्या अमलांतून निसटला, त्या बिंदुजवळ येतांच छेदतील. जर हा ग्रह केवळ सूर्याच्या गुरुत्वाकर्षणाच्या अमलाखालींच फिरत असता तर वर सांगितलेल्या बिंदूपाशीं तो नक्कीच पुन्हा कांहीं कालानंतर आला असता. परंतु आतां तो सूर्यमालेच्या कुटुंबाचा एक घटक झाला आहे. तेव्हां या कुटुंबांतील इतर ग्रहगोलांचे गुरुत्वाकर्षणही त्यावर पडणारच. त्यामुळें साहजीकच, हा ग्रह पुन्हा नेमका त्याच बिंदूला येणें कठीण आहे.

नूतन वर्षाच्या सुरवातीला रशियानें आकाशांत फिरत ठेवलेला कृत्रिम ग्रह म्हणजे भविष्यकालीं अवकाशांत सफरी काढूं इच्छिणाऱ्या आंतर्ग्रह प्रवाशांचा एक माहितगार वाटाड्या मित्रच होय. अवकाशाच्या अनंत अशा अवाढव्य पोकळींत चाचरू पाहणाऱ्या आंधळ्याची हा ग्रह म्हणजे काठीच म्हणा हवी तर !

• • •

जोशी. तिचें 'कॅक्टस' हें चित्र तिनें तन्मय होऊन केलेल्या विचारांची साक्ष होती. तिच्या कांहीं चित्रांवर श्री. गायतोंडे, पळशीकर आदि विचारवंतांचा जबर परिणाम दिसून येत होता. 'व्हॅन गॉग' बद्दलही तिला अत्यादर असल्याचें कांहीं ठिकाणीं दिसून आलें. इतकेंही असून एकंदर प्रदर्शन वेधक आणि प्रगतिशील वाटलें.

—गोपालन्




### सुस्वागतम् !

भरलेल्या संसाराचा त्याग करून देशसेवेचें असिधाराव्रत पत्करणाऱ्या ज्या कांहीं सबला हिंदभूला ललामभूत झाल्या त्यांत सौ. सुधाबाई जोशी यांचंही नांव निश्चितच समाविष्ट झालेलं आहे. गोव्याचा स्वातंत्र्यलढा तेजस्वी व्हावा, इतर कार्यकर्त्यांच्या मरगळलेल्या मनानां चैतन्याची धार चढावी म्हणून सर्व सुखाचा त्याग करून त्यांनी सतीचे वाण घेतलें. आणि चार वर्षांपूर्वीं चारी बाजूंना जीवघेण्या संगीनी मृत्यूला आव्हान करीत रखरखीत डोळ्यांनी बघत असतांनासुद्धां त्याना न जुमानतां गुप्त मार्गानें त्यांनी व्याघ्रगुहेंत प्रवेश केलाच. आपलें इप्सित कार्य पुरें करतांना त्यांना पकडण्यांत आलें. आणि त्यांच्यावर खटला होऊन त्यांना वीस वर्षांची प्रदीर्घ शिक्षा झाली. बाणेदारपणानें त्यांनी त्या शिक्षेचा स्वीकार केला.

आणि आज त्यांची आश्चर्यकारकरीतिनें सुटका झालेली आहे.

सौ. सुधाबाईंना आम्हीं सादर अभिवादन करतों.

### राजकीय दुही

महाराष्ट्रांतील बुद्धिमान् आणि कर्तृत्वशाली व्यक्ति गुण्यागोविंदानें एकत्र एका छत्राखालीं कधींच फार काळ नांदत नाहींत असा आतांपर्यंतचा अनुभव आहे. महाराष्ट्रांत जितके पुढारी तितके पक्ष असूं शकतात. गेल्या महिन्यांत संयुक्त महाराष्ट्र समितीच्या राजकारणाला जें वळण लागलें त्यावरून समितीच्या राजकारणांतील ही फाटाफूट आणि चव्हाणांच्यावर

( पान ५३ वर पहा )

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

( पान २२ वरून चालू )

" तुला मीं बसस्टॉपजवळ पाहिलं ना, तेव्हांच मला वाटलं, कीं हा सत्पर्षी कांहीं सुखी नाहीं. तूं अगदीं त्रासलेला, दमलेला दिसलास," रेळे माझ्या पाठीवर हात ठेवीत म्हणाला.

" मग हें बघ, तूं कांहीं माझ्या नोकरीसाठीं त्रास करून घेऊं नकोस. "

त्यानं दुसरी सिगरेट शिलगावली. एक मला दिली.

सिगरेट पेटवीत मी म्हणालों, " अरे, त्रास कसला त्यांत ? तुझ्या-साठीं एवढं नाहीं होणार माझ्या हातून ? मी जरूर खटपट करणार. जमलं तर जमलं. तशी जराजरी शक्यता वाटली तर मी तुला घरीं येऊन देखील सांगेन. तूं पत्ता देऊन ठेव. "

" Thanks. पण तूं "—

" कांहीं बोलूं नकोस. तूं गिरगांवांत रहातोस ना ? मी घरीं येईन तुझ्या. ट्रॅममधून जातांना तुला एकदोनदां गॅलरींत पाहिलंय् मी !...बिल्डिंगचं नांवहि सांगूं शकेन मी... मला वाटतं, ' बलवंत भुवन ' कीं...' बलवंत सदन ' असं कांहीं तरी नांव आहे. "

" बरोबर. दोन्हीं बिल्डिंग्ज् लागूनच आहेत. एक आहे ' बलवंत भुवन ' नि एक आहे ' बलवंत सदन. ' तिथं कुठंहि विचार तूं रेळे म्हणून. दोन्हीं बिल्डिंग्ज् माझ्याच आहेत. वडलांचं नांव दिलंय् त्यांना...आणि हें पहा, सहज म्हणून घरीं आलास तरीहि चालेल. मला नोकरीची तेवढी कांहीं आवश्यकता नाहीं. हजार अकराशें रुपये भाडें येतं मला. पण घरीं बसायचं त्यापेक्षां कुठं नोकरी मिळाली तर बरं म्हणून बघायचं. तुला कंपनींत फार काम असतं, त्यांत मी आणखी तुला बिचाऱ्याला त्रास देणं म्हणजे —"

बेवी रेळे माझा निरोप घेऊन केव्हां गेला तें मला नीटसं कळ-लंच नाहीं. पण तो जातांना इतका मोठा होत गेला कीं मी त्याच्या बुटाइतक्या उंचीचा झालों होतों नि त्यानं दिलेली कॅप्स्टन् सिगरेट चुरगळून बस स्टॉपवर बायची राहिलेली अर्वाच्य शिवी हेडक्लार्क कानड्याच्या नांवापुढं जोडत होतों ! !

• • •

( पान ४९ वरून चालू )

पाणी सर्वांना निर्मळ कां ठेवतं ?

—कारण तें सारखं वहात असतं.

पाण्याच्या मार्गांत अडथळे कां येत नाहींत ?

—कारण तें सारखं वहात असतं.

पाण्याच्या एका बिंदूपासून नदी—नदीपासून महानदी—व महानदीपासून समुद्र कां होतो ?

—कारण तें सारखं वहात असतंच

कितीतरी वेळपर्यंत मी तिथें निःशब्द उभा होतों—ऐकलेल्याचं मनन करीत. आणि तिथनं मी जेव्हां परत घरीं आलों, तेव्हां मी वहातं पाणी होतों—आजही. आहें. पाण्याला ज्याप्रमाणें लहानमोठे—वरती—खालती—स्वच्छ—घाणेरडे या कशाचीच पर्वा नसते, तसंच माझं आहे. मी या जगांत सर्वत्र जातों—सर्वत्र सारखा वहात असतों—माझ्या गती-प्रमाणें. आणि माझ्याकडे जें कांहीं थोडंफार आहे तें साऱ्यांना देत असेतों. व त्यामध्येंच जीवनाचं सार्थक मानतों.

**डॉ. हो ची मिन्ह**

व्हीएतनामचे राष्ट्रपति.

[ ह्या अंकांतील दक्षिणगंगा गोदावरी हा लेख ऑ. इं. रेडियो पुणें केंद्र यांच्या सौज-न्यानें छापला आहे. ]

## कै. रघुनाथराव देसाई



येथील न्यू भारत या छापखान्याचे मालक व आमचे हितचिंतक श्री. रघुनाथराव देसाई हे ता. २८–४–५९ रोजीं पहांटे बॉम्बे हॉस्पि-टलमध्यें कालवश झाले. मृत्युसमयीं त्यांचें वय ६२ वर्षांचे होते.

साध्या कंपॉझीटरपासून जीवनाला सुरवात करून आपल्या कर्तबगारीच्या जोरावर ते एका मोठ्या छापखान्याचे व प्रकाशन संस्थेचे मालक झाले.

त्यांच्यामागें त्यांचे कर्तबगार चिरंजीव श्री. चिंतामणी व इतर सहा मुलें आणि त्यांची पत्नी आहे. त्यांच्या दुःखांत आम्ही सहभागी आहोंत. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो !

## कै. आबासाहेब सांड्र

चेंबूर येथील दत्तात्रय कृष्ण सांड्र ब्रदर्स या संस्थेचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. गोविंद कृष्ण उर्फ आबासाहेब सांड्र यांचे गेल्या एप्रीलांत हृदयविकारानें दुःखद निधन झालें.

आबासाहेबांचा ' दीपावली ' वर लोभ होता. आबासाहेबांच्या मृत्यूनें सांड्र ब्रदर्स संस्थेचें कधींहि भरून न येण्यासारखें नुकसान झालें आहे.

आबासाहेबांच्या परिवाराच्या दुःखांत आम्ही सहभागी आहोंत. ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांती देवो !

## कै. सावित्रीबाई बागवे

दीपावलीचे मुंबईचे एजंट श्री. बाबूराव बागवे यांच्या मातोश्री श्रीमती सावित्रीबाई बागवे यांना दीर्घकालीन आजारानें ता. १०–४–५९ रोजीं वयाच्या ८० व्या वर्षी मृत्यु आला.

घरची गरीब परिस्थिती असतांही त्यांनी धैर्यानें आपल्या दोन्ही मुलांचे शिक्षण पुरे केलें व त्यांना चांगल्या स्थितीस आणलें. बाबूरावांचे धाकटे बंधु सदाशिवराव हे लष्करांत मेजरच्या हुद्यावर आहेत.

सावित्रीबाईंचा स्वभाव प्रेमळ—परोपकारी होता. ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांती देवो !

—०—






REGD. NO. B-7640





अनुक्रमणिका